# डॉ. कैलास

## ( सा मा जि क ना ट क )

[ इंदूरच्या महाराष्ट्र साहित्य सभेच्या यशवंत नाट्य पारितोषिकाच्या
दुसऱ्या स्पर्धेंत पहिलें पारितोषिक मिळालेलें. ]



ले ख क

**विनायक देवरुखकर**




जोशी ब्रदर्स बुकसेलर्स ॲण्ड पब्लिशर्स,
अप्पा बळवन्त चौक, पुणें २.

आवृत्ति २ री : १९५४ ] [ मूल्य : सव्वा रुपया

'डॉ. कैलास' या नाटकाचा पहिला प्रयोग विजयादशमी, दि. ९-१०-१९५१ या दिवशीं रात्रौ सोशल क्लबाचे (ना. सं. मं.) अनावृत (ओपन एअर) नाट्यगृहांत करण्यांत आला.

**दिग्दर्शक** : प्रा. ज. म. आठवले,
एम्. ए., एम्. एस्सी.

**निर्माते** : श्री. बाबूराव विजापुरे

**साहाय्यक** : श्री. स. द. वाडेकर

**संगीतनियोजक** : श्री. भाऊसाहेब पुराणिक

**भूमिका :**

**डॉ. कैलास** : प्राध्यापक आठवले

**बाबासाहेब** : श्री. बापूसाहेब केळकर

**सुरेन** : राजा फडणीस

**हरबा** : बाबूराव विजापुरे

**काळे** : वसंत मालेगांवकर

**शांताबाई** : कु. सरला गुप्ते

**कालिंदी** : सौ. आशा गाडगीळ

**रेखा** : कु. कुमुद अभ्यंकर

**तारवाले** : श्री. स. द. वाडेकर, श्री. वि. शा. काळे

**वादक** : **पेटी** : श्री. भाऊसाहेब पुराणिक
**तबला** : पां. वि. साबडे
**व्हायोलिन** : बाळ पालकर

प्रकाशक—**केशव वामन जोशी**, २५ बुधवार पेठ, पुणें २.

मुद्रक—**रा. ना. सरनाईक**, सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार पेठ, पुणें २

## -: सादर समर्पण :-

प्रतिभावैभव, कल्पनाविलास आणि भाषासौंदर्य

यांच्या सामर्थ्यावर ज्यांनीं मराठी वाङ्मयांत

नावीन्य निर्माण केलें त्या—

**कै. राम गणेश गडकरी**

यांच्या स्मृतीस—

—विनायक देवरुखकर

# तिसऱ्या घंटेपूर्वी—

सोशल क्लबच्या सहकार्यानें आज मीं पुस्तकप्रकाशनाच्या प्रांगणांत पहिलें पाऊल टाकलें आहे. सामाजिक कूट प्रश्नांची चर्चा करावी, समाजाला कांहीं तरी शिकवावें किंवा वळण लावावें हा माझा अधिकार नाहीं. दिवसभर कष्ट करून शिणलेल्या जीवांना थोडासा विरंगुळा द्यावा या हेतूनें हें नाटक लिहिलें आहे.

जीवनांत घडणाऱ्या घटना कधीं कधीं कथाकादंबरीपेक्षांहि अद्‌भुत असतात. नेहमींच्या आयुष्यक्रमांत न पटणारी गोष्ट घडली म्हणजे, 'हें होणें शक्य नाहीं' असें वाटतें, आणि त्यांतूनच कथाप्रसंग निर्माण होतो. सकृत्‌दर्शनीं वाटणारी विसंगति वस्तुस्थितीशीं सुसंगत असते. अशाच एका विसंगतींतून या नाटकाचा जन्म झाला आहे.

नाटक लिहीत असतांना ग. त्र्यं. ऊर्फ शाहूराव कानिटकर, डॉ. शं. कृ. देवभक्त, श्री. हंसराज कोरडे आणि माझे स्नेही यांच्या हार्दिक उत्तेजनामुळें हें नाटक लिहून पूर्ण झालें, त्यांचा मी फार आभारी आहें.

सोशल क्लबनें हें नाटक अत्यंत परिश्रमपूर्वक बसवून रंगभूमीवर आणलें. आर्थिक अडचणींची क्षिति न बाळगतां माझ्यासारख्या नव्या नाटककाराचें हें नाटक प्रकाशित करण्यास सर्वस्वीं साहाय्य केलें याबद्दल सोशल क्लबचे आभार मानावेत तेवढे थोडे आहेत. छायाचित्रकार श्री. गोडसे, मुखपृष्ठाची सजावट आकर्षक केल्याबद्दल पेन्टर्स कंबाइन्ड ब्लॉक मेकर श्री. भिडे, ह्या सर्वांचा मी आभारी आहें.

—**विनायक देवरुखकर**



**पत्ता**—विनायक देवरुखकर, १९८।१४१६ सदाशिव पेठ,
ब्लॉक नं. २०, पुणें २.

# डॉ. कैलास



## अंक पहिला

[ **स्थळ :** दिवाणखाना. आधुनिक पद्धतीनें शृंगारलेला. भिंतीच्या खुंटीवर उपरणें. शांताबाई स्वेटर विणीत आहेत. परंतु त्यांचें त्याकडे नीट लक्ष नसतें. मधून मधून त्या शून्य नजरेनें अंतराळांत पाहतात. त्यांच्या चर्येवरून त्या आजारी आहेत असें स्पष्ट दिसतें. त्यांची मुलगी कालिंदी गाणें म्हणत असते. ]

### पद १ लें

**हंसत फुलत कलिका, उपवनीं ।**
**पसरुनियां मधुगंध दिशांना–**
**वेधित मोहुनि मानस रसिका ।। धृ० ।।**
**मधुर प्रणय सुखदा जगताला,**
**फुलवित आशा जीवन-लतिका ।। १ ।।**

**कालिंदी :** ( गाणें संपल्यावर घड्याळांत पाहून ) आई, तुझ्या औषधाची वेळ झाली. [ तिच्या बोलण्याकडे शांताबाईचें लक्ष नसतें. त्या गंभीर मुद्रेनें स्वेटरकडे पाहतात. ]

**कालिंदी :** ( पेल्यांत औषध ओतीत ) आई, घे हा डोस, म्हणजे बरं वाटेल. ( पेला पुढें करून ) कसला विचार करतेस ? घे ना !

**शांताबाई :** ( पेला घेऊन ) घेतें बाई ! ( पिऊन ) कालिंदी, कंटाळलें ई मी या दुखण्याला !

**कालिंदी :** असं कां म्हणतेस? डॉक्टर तर म्हणत होते कीं तुला आत लौकर बरं वाटेल म्हणून!

**शांताबाई :** डॉक्टरना काय कळतंय्! हें आजारीपण, हीं औषधं आणि तें पथ्यपाणी या सर्वांचा मला अगदीं वीट आलाय्. असल्या या हालअपेष्टांत आणि या दुखण्यांत खितपत पडण्यापेक्षां परमेश्वरानं माझे एकदां डोळे मिटले—

**कालिंदी :** ( तिच्या तोंडावर हात ठेवून ) असं अभद्र बोलूं नकोस गडे! आई, ( स्वेटर पहात ) किती दिवस झाले हा स्वेटर विणायला घेतला आहेस! केव्हां पुरा करणार? भैय्याला तर तो लवकर पाहिजे.

**शांताबाई :** हा स्वेटर पुरा होईल असं मला वाटत नाहीं.

**कालिंदी :** कां ग?

**शांताबाई :** कां! ( स्वेटर पाहून गंभीर होतात. )

**कालिंदी :** आई, कसला विचार चाललाय् ग? मला तर बाई तुझ्या बोलण्याचा उलगडाच होत नाहीं. आई, कसला विचार करतेस? बोलतांना अशी अडखळतेस कां? ( लाडिकपणानें ) आई, मी तुझी ना? मग मला नाहीं का सांगायचं? आई—

**शांता० :** कालिंदी, तुझ्यासारखी प्रेमळ मुलगी माझ्याभंवतीं पांखरा-सारखी वागडत असतांना माझ्या मनांत दुसरा कोणता विचार येणार?

**कालिंदी :** असं बोलणं फिरवूं नकोस. आई, सांग ना–

**शांता० :** ( स्वेटरकडे पहात अस्वस्थतेनें ) कालिंदी–कालिंदी–

**कालिंदी :** तुला त्रास होत असला तर नको सांगूं. पण अशी विचार करूं नकोस.

**शांता० :** कालिंदी, हा स्वेटर तूंच पुरा कर. माझ्या हातनं एकसारखं बसणं होत नाहीं.

**कालिंदी :** आजारी असतांना कशाला करायला घेतलास तूं? राहूं दे तो. मीच पुरा करीन.

**शांता० :** बरं. पण नको. मीच पुरा करीन. दोन-तीन स्वेटर करायला घेतले, पण माझ्या हातनं एकहि पुरा झाला नाहीं. निदान माझ्या सुरेनचा हा एवढा स्वेटर पुरा करतें. माझ्या दुखण्यामुळं त्याचा जीव

अगदीं खालीं वर होत असतो. माझ्या सुखासाठीं तो सारखा धडपडतो. त्याचा स्वेटर मीच करतें. किती वेळ झाला ग त्याला बाहेर जाऊन ?

**कालिंदी :** झाला असेल तासभर. आज त्याच्या वकिलीच्या परीक्षेचा निकाल आहे ना ? निकाल समजल्याबरोबर तो धांवत आल्याशिवाय राहायचा नाहीं. (बाहेर पाहून) अजून हरबा कां बरं आला नाहीं ? आज फारच उशीर झाला त्याला. आतां बाबा रागावतील. [ पडद्यांत बाबासाहेब– " हरबा, अरे हरबा ! " ] अगबाई, बाबाच हांक मारताहेत. आणि अजून तर हा आलेला नाहीं.

**बाबासाहेब :** ( सदऱ्याच्या गुंड्या घालीत प्रवेश करतात. ) अजून आला नाहीं हरबा ? काय म्हणावं या नोकरांना ! वेळेवर कामाला यायचं नाहीं, नीट लक्ष लावून काम करायचं नाहीं ! असला नोकर कामावर ठेवण्यापेक्षां काढून टाकावा हेंच चांगलं.

**कालिंदी :** बाबा, त्याचा नातू विषमज्वरानं आजारी आहे. त्याचं औषधपाणी करण्यांत त्याला उशीर झाला असेल !

**बाबासाहेब :** म्हणून काय झालं ? आज त्याचा नातू आजारी आहे, उद्यां त्याचा मुलगा आजारी पडेल, आणि परवां तो स्वतः आजारी पडेल, पुढं—

**शांता० :** असं बोलूं नका. इतकीं वर्षं तो आपल्याकडे नोकरी करतोय्. तेव्हां त्याच्याकडे नोकर या दृष्टीनं बघणं बरं नव्हे. तो आपल्या घरांतलाच एक माणूस झालाय् आतां.

**बाबासाहेब :** असल्या आपलेपणानंच तुम्हीं त्याला शेफारून ठेवलाय्. नोकराबद्दल इतका कशाला आपलेपणा ?

**शांता० :** तुमचं नेहमीं परगांवीं जाणं होतं. त्या वेळीं तो सोबतीला असला म्हणजे मी अगदीं निष्काळजी असतें. तो इमानी आहे म्हणून तर सगळं सुरळीत चाललंय्.

**बाबासाहेब :** तो इमानी आहे कीं बेइमानी आहे हा प्रश्न नाहीं. त्यानं वेळेवर कामाला हजर राहिलं पाहिजे एवढंच माझं म्हणणं. आतां मला चंदनगडच्या राजेसाहेबांना भेटायला जायचंय्. माझ्या कपड्यांची आणि

जाण्याची तयारी नको का करायला ? मालकाला कोणत्या वेळीं काय पाहिजे याची सारी खबरदारी नोकरानं घेतली पाहिजे.

**शांता०** : सगळंच विचित्र तुमचं ! तुमची मर्जी संभाळायची म्हणजे सोळा सोमवारांचं व्रत. तुमची कितीहि बडदास्त ठेवली आणि त्यांत जरा कमी पडलं कीं सगळंच बिघडतं. हरबा आला नाहीं तरी मी आहें ना ?

(उठूं लागतात.)

**बाबा०** : अग पण—तुम्ही उठूं नका. अगोदरच तुम्ही आजारी ! त्यांतून दुखणं अगदीं पाठ सोडीत नाहीं. तुमची प्रकृति ठणठणीत झाली म्हणजे मग आहेच. शिवाय माझ्या बोलण्याचा तसा इरादा नव्हता. नोकरांच्या बाबतींत नरम वागूं नये एवढंच मला म्हणायचं होतं. सुरेन् दिसत नाहीं कुठं ? गेलाय् कुठं तो ?

**कालिंदी** : आज त्याच्या परीक्षेचा निकाल समजायचा आहे ना ? म्हणून तो बाहेर गेलाय्.

**बाबा०** : हो ऽ ऽ ! ही गोष्ट मी कामाच्या गडबडींत विसरलोंच !

**शांता०** : मुलाच्या परीक्षेचीसुद्धां तुम्हांला आठवण नाहीं !

**बाबा०** : तसं नव्हे. आजचं वर्तमानपत्र वाचलं नाहीं वाटतं ! कांहीं वर्षांपूर्वीं मी समाजसुधारणा-मंडळ स्थापन केलं त्याच्या इमारतीचा कोनशिलासमारंभ लौकरच होणार आहे. त्यासाठीं व्याख्यानाची तयारी करायची होती. चंदनगडच्या राजेसाहेबांना त्या समारंभाचं अध्यक्ष करायचंय्. त्यासाठीं त्यांना आतां भेटायला जायचंय्. तसंच कृष्णराव काळे यांच्याबरोबर एक नवीन व्यवहार करायचा आहे. त्या विचारांत होतों मी.

**शांता०** : कसला नवीन व्यवहार ?

**बाबा०** : तो तुम्हांला नाहीं समजला तरी चालेल. आम्ही तुमच्या घरांतल्या व्यवहाराची चौकशी करतों का कधीं ? तुम्ही घराचा कारभार पहावा, आम्ही बाहेरचा व्यवहार संभाळावा. कुणीहि कुणाच्या व्यवहारांत ढवळाढवळ करूं नये, हा आपला माझा धोपटमार्ग ! बरं, मी बाहेर जाण्यापूर्वीं सुरेन्चा निकाल समजला असता म्हणजे तेवढंच बरं झालं असत.

**कालिंदी :** मग बाबा, जरा उशीरा गेलांत तर नाहीं का चालणार ?

**बाबा० :** हेंच–हेंच आमचं जिथं तिथं नडतं ! वेळेचं महत्त्व आपल्या लोकांना जेव्हां कळेल तो सुदिन समजावा. समाजांत सुधारणा घडवून आणायची असेल तर प्रथम लोकांना वेळेचं महत्त्व पटवून दिलं पाहिजे. मनुष्याच्या आयुष्यांतला एक एक क्षण मोलाचा असतो. तो वायां दवडून उपयोगी नाहीं.

**शांता० :** आतां घरांतच व्याख्यान देणार वाटतं ?

**बाबा० :** ( हंसून ) काय हरकत आहे ? पंचवीस वर्षांमागं जाहीर व्याख्यान देण्यापूर्वी मी तुलाच श्रोता करून घरांतच व्याख्यानाची तालीम घेत नव्हतों का ? आज मी मोठीं व्याख्यानं देतों, या माझ्या यशाचं श्रेय तुलाच आहे. पुढारी व्हायच असेल तर त्याला व्याख्यान देतां आलं पाहिजे; आणि व्याख्यानबाजी कमवायची असेल तर त्यानं स्वतःच्या पत्नीसमोर प्रथम व्याख्यानबाजी गाजविली पाहिजे. समजलं ?

**शांता० :** ( हंसून ) कांहीं तरीच आपलं बोलणं.

**बाबा० :** कांहीं तरी कां म्हणतां ? माझ्या कोणत्या वाक्याला टाळ्या पडतील हें तुम्हीच मला अगोदर सांगत होतां; आणि नेमक्या त्याच वाक्यांना लोक टाळ्या वाजवीत असत.

**शांता० :** हें मात्र खोटं बरं का ! एकदां मला दुपारीं झोंप येत होती. त्या वेळीं आपण माझ्यासमोर व्याख्यान झोडलंत. व्याख्यानाच्या तालावर मला झोंप लागली; आणि टाळ्या द्यायला मी विसरून गेलें. केव्हां बाहेर जाणं झालं तेंसुद्धां मला समजल नाहीं. घरीं परत आल्यावर आपण सांगितलं कीं, तें व्याख्यान फार उत्तम वठलं म्हणून.

**बाबा० :** ( हंसून ) असं एकदां झालं खरं. तें असो. ( घड्याळांत पाहून ) माझी जाण्याची वेळ होत आली आणि अजून हरबाचा पत्ता नाहीं. माझे कपडे–

**कालिंदी :** मी काढून ठेवतें हं बाबा. ( जाते. )

**बाबा० :** हें बघा, कृष्णराव काळे येतील आतां. माझ्याचबरोबर निघतों म्हणाले. ते आले कीं आम्ही दोघेजण जाऊं राजेसाहेबांकडे. [ दारावर घंटा वाजते. "बाबासाहेब, येऊं का आंत ?" बाबासाहेब

दाराकडे जाऊन ] या ! या ! ( कृष्णराव काळे प्रवेश करतो. ) इतका शिष्टाचार कशाला ?

**काळे :** काय लाखांत बोललांत ! असं कसं बाबासाहेब ? अहो, शिष्टाचार हा सुधारणेचा आधार आहे. असो. बाबासाहेब, तुमच्या इच्छेप्रमाणं लवकरच आपल्या समाजसुधारणामंडळाचा कोनशिलासमारंभ होणार. एक मोठा समाजपुढारी म्हणून लोक तुम्हांला केवढा मान देतात ! आतां इमारत पुरी झाली म्हणजे तुमच्या सर्व श्रमांचं सार्थक होईल !

**बाबा० :** यांत मोठा वांटा तुमचा आहे. तुम्ही मंडळाला भली मोठी देणगी दिलीत, म्हणून तर मंडळाची इमारत उभी होणार आहे. तुमच्या-सारखे दानशूर लोक समाजांत आहेत म्हणून तर सार्वजनिक संस्था टिकाव धरून असतात.

**काळे :** कसचं ! कसचं ! इकडे तिकडे थोडा का खर्च होतो माझा ? दानधर्म केला म्हणजे तेवढंच बरं ! अहो, तुमच्यासारखे मोठे लोक आहेत, त्यांच्यामागनं आम्हीं जायचं नाहीं तर काय करायचं ? बरं का बाबा-सांहेब, सगळीकडे सुधारणा होत राहावी अस मला वाटतं. हॅं ऽ ऽ ! सुधारणेचा नुसता धुमधडाका उडाला पाहिजे. घरांत सुधारणा, दारांत सुधारणा, रस्त्यांत सुधारणा, खेड्यांत सुधारणा, शहरांत सुधारणा. सुधारणेचे डोंगर उपटताहेत, ज्वालामुखी, धडधडताहेत—

**बाबा० :** अहो काळे—काळे—सुधारणा म्हणजे काय हें तरी समजतंय् का तुम्हांला ?

**काळे :** तें मला समजत नाहीं. सुधारणा झाली पाहिजे एवढं मला समजतंय्. पोरांनीं, थोरांनीं, म्हाताऱ्यांनीं सुधारणा केली पाहिजे. एक-मेकांना नमस्कार करतांना ‘ जय सुधारणा ! ’ म्हणून नमस्कार केला पाहिजे.

**बाबा० :** अहो, तुम्ही तर व्याख्यान देऊं लागलांत कीं !

**काळे :** काय लाखांत बोललांत ! हा तुमच्या संगतीचा परिणाम बरं ! तुमच्याप्रमाणें मलाहि व्याख्यान द्यावंसं वाटतं. सांगा, काय करूं मी ?

**बाबा० :** सांगूं तुम्हांला ?

**काळे :** हॅं ऽ ऽ ! सांगा. धाडकन् सुधारणेच्या समुद्रांत बुडी मारतों.

**बाबा० :** मीं पुनर्विवाह केला तसा माझ्याप्रमाणं तुम्हीहि पुनर्विवाह करा.

**काळे :** ( आश्चर्यानें ) अं ऽ ऽ !

**बाबा० :** एखाद्या बालविधवेशीं पुन्हां लग्न करा.

**काळे :** ( पडक्या स्वरांत ) काय लाखांत बोलतांत ! बालविधवेशीं ? पुन्हां लग्न करूं ? म्हणजे मी तिला दुसरा नवरा होऊं ?

**बाबा० :** होय.

**काळे :** दुसरा नवरा ! अं ऽ ऽ ! आपल्याला नाहीं तें जमायचं.

**बाबा० :** कां हो ?

**काळे :** अहो भलतंच ? आमचा जोडा कसा कोरा करकरीत राहिला पाहिजे.

**बाबा० :** मग तुम्ही नुसते उदार देणग्याच देत जा म्हणजे झालं.

**काळे :** हाँ ऽ ऽ ! तें जमेल.

**बाबा० :** हें पहा मिस्टर काळे, आज मी तुमच्याबद्दल बोलणार आहें.

**काळे :** म्हणजे ? भलतंच कांहीं तरी बोलणार आहांत कीं काय ?

**बाबा० :** छे हो ! आज राजेसाहेबांच्यासमोर तुमचा असा गौरव करतों, असा गौरव करतों——

**काळे :** मी घरीं जातों.

**बाबा० :** कां हो ?

**काळे :** म्हणजे असं, तुम्ही माझा मोठा गौरव करणार आहांत, सन्मान करणार आहांत आणि तो राजेसाहेबांच्या समोर ! म्हणजे माझ्या डोक्यावर मोठा बोजाच पडणार कीं ! आणि माझ्या डोक्यावर ही असली टोपी ! तिच्यावर तें भलं मोठं ओझं कसं झेंपणार ? म्हणून म्हणतों कीं पगडी घालावी हेंच बरं. संस्थानिकांची भेट घेतांना पगडीच बरी. काय पगडींत रुबाब आहे महाराज ! अहो ! गोखले, रानडे, तेलंग यांचीं चित्रं पाहिलीं आहेत मीं. त्या घेरेदार पगड्या किती तरी भारदस्त दिसतात. फुकट मोठेपणा मिळाला नाहीं त्यांना पगडीशिवाय !

**बाबा० :** ते लोक विद्वान् होते, मिस्टर काळे !

**काळे :** असतील. ते विद्येनं श्रीमंत असले तर मी पैशानं श्रीमंत आहें. बरं का, राजेसाहेबांच्याकडे जायच्याअगोदर आपण माझ्या घराकडूनच

जाऊं या, म्हणजे मला पगडी घालतां येईल. ( आंत पहात ) बाबासाहेब, आपली कालिंदी दिसत नाहीं कुठं ?

**बाबा० :** माझे कपडे काढण्यासाठीं गेलीय् आंत.

**काळे :** बरं का बाबासाहेब, तुमची कालिंदी आपणाला फार आवडली बुवा ! इतकी गरीब, प्रेमळ आणि आज्ञाधारक मुलगी दुनियेंत सांपडायची नाहीं !

**बाबा० :** माझी मुलगी आहे ती.

**काळे :** काय लाखांत बोललांत ! तसंच तुमचे चिरंजीव सुरेन्. वा ! वा ! मुलं असावींत तर अशीं असावींत !

**बाबा० :** तोहि कालिंदीसारखा आज्ञाधारक आहे.

**काळे :** हॅं ऽ ! तसं म्हणूं नका. मुलीवर बाप जशी सत्ता गाजवतो तशी हुकमत मुलावर नाहीं चालवितां येत.

**बाबा० :** पण इथं तसं होणार नाहीं. तो माझ्या शब्दाबाहेर कधींहि जाणार नाहीं.

**शांता० :** अहो काळे, तुमच्या लग्नाचे लाडू कधीं मिळणार आम्हांला ?

**काळे :** काय लाखांत प्रश्न विचारलांत ? मनासारखी मुलगी मिळेपर्यंत लग्नच करायचं नाहीं असा माझा निश्चय आहे !

**शांता० :** किती दिवस हा निश्चय कायम राहणार ?

**काळे :** कशाला थट्टा करतां माझी ? अहो, लग्न होईपर्यंत !

**बाबा० :** काळे, हा निश्चय फार दिवस लांबवूं नका. कारण आतांच तुम्ही चाळिशीच्या—

**काळे :** नाहीं, नाहीं, पस्तिशीच्या–

**बाबा० :** बरं, पस्तिशीच्या घरांत आहांत. आणखी दोन-चार वर्षं गेलीं म्हणजे तुमच्याबरोबर कुणीहि मुलगी लग्नाला तयार होणार नाहीं.

**काळे :** चुकतां आहांत तुम्ही बाबासाहेब ! तुम्हांला मुलगी नसती तर तुमचं बोलणं खरं मानलं असतं. मी गरीब माणूस नाहीं. पैशानं पोरी खेंचतां येतात. कांहीं मुलींचे बाप माझ्यामागं इतके लागले आहेत कीं एका दिवशीं एकाच मुहूर्तावर पन्नास लग्नं करून दाखवीन मी ! आहांत कुठं ? लग्न हा माझ्या डाव्या हाताचा खेळ आहे मेहेरबान !

**शांता०** : मग एकदां तो खेळ कराच.

**काळे** : माझा खेळ—(कालिंदी कपडे घेऊन येते, तिच्याकडे पाहत ) माझा खेळ वाटेल त्या वेळेला खेळेन मी.

**कालिंदी** : बाबा, तुमचे कपडे. ( कपडे देते. )

**बाबा०** : ( कोट घालीत ) चला काळे, राजेसाहेबांच्या बंगल्यांत मानाची खुर्ची तुमची वाट पाहात असेल—

**काळे** : आणि लग्नाची मुलगी—

**कालिंदी** : ( बाबासाहेबांच्या हातांत काठी देत ) बाबा, ही काठी.

**बाबा०** : ( काठी, उपरणें घेऊन ) चला काळे. बोलण्यांत वेळ नको जायला. ( शांताबाईंस ) बरं, आम्ही जाऊन येतों. आणि हें पहा, सुरेनचा निकाल समजला म्हणजे ताबडतोब पेढे आणण्याची व्यवस्था करा.

**काळे** : आमच्यासाठीं दोन राखून ठेवा बरं का ! नाहीं तर विसर पडायचा.

**शांता०** : बरं. ( बाबासाहेबांस ) येतांना हरबाच्या घरीं जाऊन या.

**बाबा०** : मी नाहीं जाणार. मला वेळ होणार नाहीं. तुम्ही इतकी कशाला काळजी करतां त्याच्या नातवाची ?

**काळे** : ( कालिंदीकडे पाहून ) आतां स्वतः नातवाची काळजी घेण्याची तयारी करा.

**बाबा०** : हं, चला काळे.

**काळे** : चला. ( दारापर्यंत जाऊन मागें वळून 'जय सुधारणा !' म्हणून नमस्कार करून हंसतो. कुणी हंसत नाहींसें पाहून उभा चेहरा करतो. दोघे जातात. )

**कालिंदी** : फारच चमत्कारिक माणूस दिसतो हा ! आई, या माणसाची नजर अगदीं विषारी दिसत होती. कशाला बाबा याला घरांत आणतात कुणास ठाऊक !

**शांता०** : त्याचं येणं मलासुद्धां आवडत नाहीं. पण काय करणार ? यांच्या व्यापाराला हा मदत करतो, म्हणून नाइलाज होतो माझा. आतां हे कसला नवीन व्यवहार करणार आहेत कोण जाणे ! काळ्यांशीं संबंध

ठेवूं नका म्हणून मीं मागं सांगितलं, तर ते म्हणाले, असलीं श्रीमंत माणसं हाताशीं धरून आपलीं कामं करून घेतलीं पाहिजेत.

**कालिंदी** : तरीच त्यानं बाबांच्या सुधारणामंडळाला देणगी दिली वाटतं! आई, तूं कांहींहि म्हण किंवा बाबा कांहींहि म्हणोत, हा माणूस बाबांचा घात केल्याशिवाय राहणार नाहीं असं मला वाटतं.

**शांता०** : खरं आहे तुझं म्हणणं ! पण बोलायचं कुणीं ? मागं झालेल्या नुकसानीमुळं हे फारच एककल्ली झालेत. कांहीं सांगायला गेलं कीं तुम्हीं नको शहाणपणा शिकवायला असं म्हणतात. आजचंच पहा ना. सुरेनच्या परीक्षेचा निकाल आहे, हें त्यांच्या ध्यानींमनीं तरी आहे का ? कां बरं आला नाहीं अजून सुरेन ? [ विणूं लागतात. ]

[ पडद्यांतून आलाप घेत सुरेन दाराशीं येऊन दबकतो. खुंटीवर उपरणें नाहीं असें पाहून 'बाबा नाहींत' म्हणून चुटकी वाजवितो. रेखेचा हात धरून तिला पुढें ओढीत गाण्याची तान मारीत प्रवेश करतो. ]

**शांता०** : (आश्चर्यानें) हें काय आरंभलं आहेस तूं ? असा वेड्यासारखा गातोय्स काय ?

**सुरेन** : आतां गाणार ! अगदीं वेड्यासारखा गाणार ! हिला घेऊन असा गरगरां फिरत गाणार ! ( पुन्हां आलाप घेत रेखेभोंवतीं वर्तुळाकार फिरतो. )

**शांता०** : अरे पण सुरेन, परीक्षेचा निकाल काय लागला ?

**सुरेन** : निकाल ! ( तान मारतो. ) निकाल ! ( हंसून गाण्याची ओळ म्हणतो. )

**शांता०** : पास झालास का ? मला तर बाई काळजी वाटते.

**सुरेन** : काळजी वाटते ? हॅट् ! आई आहेस झालं ! अग, मी वेड्यासारखा गातोंय् यावरून तरी तुला समजायला पाहिजे होतं. म्हणे काळजी वाटते. अखेर आईच्या जातीवर गेलीस !

**कालिंदी** : भैय्या, इतकं बोलण्यापेक्षां पास झाला आहेस हें सांगितलं असतंस तर काय झालं असतं ?

**सुरेन** : ( वेडावून ) क्याय झालं असतं ? अग, समजायला पाहिजे मी पास झालों म्हणून. नुसता पासच नव्हे तर पहिल्या वर्गांत आलोंय् मी ! थ्री चीअर्स फॉर माय फर्स्ट क्लास. हिप हिप हूर्रे ! आई, तुझा सुरेन आतां मोठा नामांकित वकील होणार ! आहेस कुठं तूं !

**शांता०** : माझा आशीर्वाद आहे तुला. ( रेखाकडे पाहून ) या कोण ?

[ कालिंदी बोलणार तोंच सुरेन तिला चिमटा घेतो. ती ' आईऽऽग ' म्हणून ओरडते. ]

**सुरेन** : काय म्हणालीस ? या कोण ? अंऽऽ ! खरंच, या कोण ? ( रेखेला ) का हो, तुम्ही कोण ?

**कालिंदी** : असली कसली रे चेष्टा तुझी ? आईनं सरळ विचारलं तर त्याला हें उत्तर होय ?

**सुरेन** : अग, सगळींच उत्तरं सरळ द्यायचीं नसतात. आतां वकील झालोंय् मी, तेव्हां आडवळणानंच मुख्य मुद्द्यावर आलं पाहिजे. ( रेखेस ) हं, तुम्ही कोण तें सांगा बघूं.

**रेखा** : ( तोंडाला रुमाल लावून हंसत ) ही काय मेली थट्टा !

**सुरेन** : थट्टा ! मी थट्टा करतोंय् काय ? अग, चांगला गंभीरपणानं विचारतोंय् कीं बाईसाहेब, तुम्ही कोण ? इथं कां आलांत ? काय काम आहे ? वगैरे वगैरे वगैरे.

**कालिंदी** : आतां स्पष्टच सांग बघूं !

**सुरेन** : बऽऽरं ! स्पष्टच सांगतों. रेखा, तूं सांगतेस कीं मीच सांगूं ? अं ! सांग, तूंच सांग.

**रेखा** : ( लाजून ) इश्श !

**सुरेन** : बायका कितीहि शिकल्या तरी त्यांच्या तोंडांतलं हें ' इश्श ' मुळींच जात नाहीं. अहो इश्श, सांगा ना तुम्ही कोण तें ?

**शांता०** : सुरेन, हा काय मुलखावेगळा चहाटळपणा !

**सुरेन** : हा चहाटळपणा नाहीं. परीक्षा पास होण्यापूर्वीपासून मी एक गुप्त कारस्थान करीत होतों. आई, ( रेखेला पुढें ओढून ) हें आमचें गुप्त कारस्थान.

**कालिंदी** : हें काय भैय्या ?

**सुरेन** : कां ? जणूं असलीं कारस्थानं तुला माहीतच नाहींत. अं ऽ !

**कालिंदी** : ( रागानें ) भैय्या, जास्त बोलूं लागलास हं !

**सुरेन** : काय करशील ग मी जास्त बोललों तर ?

**शांता०** : असं भांडतां काय तुम्ही ? सुरेन, खरंच ही कोण ?

**सुरेन** : रेखा, या माझ्या आईला नमस्कार कर. ( रेखा नमस्कार करते. ) आई, हिला आतां एक जुनापुराणा भला मोठा आशीर्वाद दे. समजलं तुला ही कोण तें ? आहे का तुला पसंत ?

[ पडद्यांत तारवाला पुकारतो. सुरेन तार घेऊन वाचीत पुढें येतो. ]

**कालिंदी** : कुणाची रे तार ?

**सुरेन** : ( वाचीत ) आमच्या प्रिन्सिपॉलची आहे.

**कालिंदी** : अगदीं अचानक तार आली ?

**सुरेन** : अचानक ! आतां पुष्कळच अचानक गोष्टी होणार आहेत. आंता कित्येक तारा आणि माणसं न बोलावतां घरीं येतील. ( तार कालिंदीस देतो. ) बघ, माझं अभिनंदन केलंय् प्रिन्सिपॉलनीं. रेखा, उभी कां ? बैस ना आईजवळ. संकोच नको बाळगूस. ( रेखा बसते. ) आई, ही रेखा. नुकतीच बी. ए. झालेली आहे. हिच्या हुषारीचं वर्णन मी करणार नाहीं. तें मी कालिंदीवर सोंपवितों. तिच्या सौंदर्यावर मीं वेगळं सांगायला नकोच. तें तुला दिसत आहेच. सगळं कांहीं पुढं कळेलच तुला. आहे का पसंत ?

**शांता०** : तुला पसंत असल्यावर मला का नापसंत होणार आहे ?

**सुरेन** : आवडली ना तुला ? तुझ्या पसंतीची मला खातरी होतीच. आतां बावांची संमति मिळवली कीं झालं काम ! ( रेखाकडे पहात ) बाकी असली सून कोण नाकारील म्हणा !

**शांता०** : सुरेन, कुणाची ही मुलगी ? कुठं राहते ?

**सुरेन** : ( गंभीरपणें ) कुणाची मुलगी ! आई, पसंत असलेल्या मुलींचे आईबाप नापसंत असले तर नाहीं का चालणार ?

**शांता०** : न चालायला काय झालं ? सोन्यासारखी लक्ष्मी दारांत आली तर तिला अडवायची का असते ? पण सुरेन, इतके दिवस हें तूं मला कां सांगितलं नाहींस ?

**सुरेन :** ज्या दिवशीं माझ्या वकिलीच्या परीक्षेचा निकाल लागेल त्याच दिवशीं हें तुला सांगायचं असं आम्हीं ठरवलं होतं, म्हणून तुला कळवलं नव्हतं. माझी ही निवड पाहून बाबासुद्धां आश्चर्यचकित होतील. त्यांना वाटेल एवढा आज्ञाधारक मुलगा असला गुप्त कट कसा करूं शकला? काय ग रेखा, असंच ना? ( रेखा लाजून हंसते. )

[ सुरेनचें अभिनंदन करण्यासाठीं दोन मित्र येतात. पुन्हां तारा येतात. ]

**सुरेन :** ( आनंदानें ) ही पहा माझ्या प्रोफेसराची तार ! या माझ्या मित्रांच्या तारा ! अभिनंदनाचा पाऊस पडतोय् माझ्यावर ! ( पाकिटें घेऊन ) रेखा, हें माझ्या यशाचं वैभव ! ( आईकडे बोट दाखवून ) आणि हें माझ्या यशाचं श्रेय ! आईची सदिच्छा माझ्या पाठीशीं उभी आहे म्हणून तर मी मोठा मान मिळवूं शकलों. मला कल्पना नव्हती मी पहिल्या वर्गांत पास होईन म्हणून ! पण ही अकल्पित घटना पाहून मी थक्कच झालों—

**डॉ. कैलास :** ( प्रवेशून ) आणि मला तुझ्या घरांत पाहून तूं थक्क झाला असशील !

**सुरेन :** कोण ? डॉक्टर कैलास ! भल्या माणसा, माझ्या घरीं येणार नव्हतास तूं, मग आज कसा आलास ?

**कैलास :** आजचा प्रसंगच असा आहे कीं, तुझ्या घरीं मला यावं लागलं. तुझ्या परीक्षेचा निकाल समजला. सुरेन, मी तुझं अभिनंदन करतों.

**शांता० :** बसा डॉक्टर. ( कैलास बसतो. )

**सुरेन :** कालिंदी, आतां चहाची तयारी करायला मीं तुला सांगितलं पाहिजे का ? गुप्त कारस्थान उघड्यावर येईल म्हणून भीति वाटते का तुला ?

**कैलास :** सुरेन, मला चहा नको.

**सुरेन :** हें काय बोलणं झालं ! अरे, मी चहा करणार नाहीं, कालिंदी करणार आहे.

**कैलास :** तें मीं विचारलं नाहीं, मला चहा नको.

**शांता०** : डॉक्टर, रेखा, तुम्ही दोघं माझ्या घरीं पहिल्यांदांच आलांत आणि आतां चहा नको म्हणतां ?

**कैलास** : माफ करा मला. पण असा आग्रह करूं नका.

**सुरेन** : डॉक्टर, माझ्या आईचा शब्द मोडूं नकोस.

**कैलास** : सुरेन, आई हा शब्द माझ्यासमोर उच्चारूं नकोस. फार चीड आहे मला त्या शब्दाची. कुणाचाहि शब्द मान्य करण्याची मला संवय नाहीं. त्यांतून स्त्रीजातीचा तर नाहींच नाहीं.

**सुरेन** : असं काय चमत्कारिक बोलतोस ?

**कैलास** : चमत्कारिक ! खरं आहे. चमत्कारिक घटनांनीं आयुष्य भरलेलं असलं म्हणजे असंच चमत्कारिक बोलावंसं वाटतं.

**शांता०** : डॉक्टर, चार वर्षांपूर्वी बोरघाटांत मोटारचा अपघात झाला. त्या वेळीं माझ्या सुरेनला प्राणांतिक जखमा झाल्या. देवदयेनं त्या अपघातांतून तुम्ही वांचलांत आणि माझ्या सुरेनला स्वतःच्या रक्ताचा पुरवठा करून त्याला मरतां मरतां वांचविलंत. एका आईचा मुलगा तुम्ही तिला परत दिलात. पण तुम्ही– तुमचे पुरते आभारहि मानूं दिले नाहींत. इतकीं वर्षं मी थांबलें...

**कैलास** : आईचा मुलगा परत देण्यासाठीं मीं रक्ताचा पुरवठा केला नाहीं, तर डॉक्टर या नात्यानं तें माझं कर्तव्यच होतं. तुमच्या असल्या आभारप्रदर्शनाचं नाटक मला मुळींच पसंत नाहीं.

**सुरेन** : इतका कसा रे तूं तुसडा ? जरा तरी माणुसकी नको का ठेवायला ?

**कैलास** : तूंच हें बोललास म्हणून मी गप्प बसतोंय्. दुसरा कुणी असता तर आवाज निघण्यापूर्वींच त्याच्या नरड्याची नळी तुटली असती ! माणूस सैतान कां होतो याचा कधीं तूं विचार केला आहेस ?

**सुरेन** : पण तो सैतान आईजवळ आला कीं त्याच्या अंतःकरणांतली माणुसकी जागी होते.

**कैलास** : सुरेन, उभ्या आयुष्यांत ' आई ' या शब्दाचा मी भावनेंत आणि कल्पनेंतहि द्वेष करीत आलों आहें. मी अनाथाश्रमांत वाढलोंय्. ज्या आईनं मला रस्त्यावर टाकून दिलं, धर्मशाळेचा मार्ग दाखविला, त्या आईविषयीं मी कसली सहानुभूति बाळगणार ? तुला माहीत

नाहीं सुरेन, अनाथाश्रमांत मी काय काय प्रकार पाहिले आहेत ते ! उकिरड्यावर फेंकलेलीं मुलं मीं पाहिलीं आहेत. ऐन तारुण्याच्या धुंदींत प्रणयाचा उपभोग घेतांना ज्या तरुणीचं मन स्वर्गसुखाचा आनंद लुटीत असतं त्या आनंदाचं प्रत्यक्ष फळ जन्माला आल्यावर दगडापेक्षांहि मन घट्ट करून ती तरुणी त्या कोंवळ्या लुसलुशीत अर्भकाला केरकचऱ्याच्या गादीवर निजविते ! तिला मी कोणत्या तोंडानं आई म्हणूं ? सुरेन, कांहीं निष्पाप बालकांची नाळसुद्धां कापलेली नव्हती रे ! ज्या मुलाला मांडीवर घेऊन आईनं अंगाई गीत म्हणावं त्याला ती खुशाल मृत्यूच्या मांडीवर ठेवते, त्या राक्षशिणीला मी आई कसं म्हणूं ? असं कां ? तर स्वतःचं पाप जगासमोर दिसायला नको म्हणून. सुरेन, चुकून पाऊल घसरलं म्हणून माझ्याकडे किती तरी कुमारिका आणि विधवा माझा योग्य सल्ला विचारण्यासाठीं येतात. त्यांना पाहून जगांतली असली स्त्रीजात नष्ट कां होत नाहीं हा विचार मनांत थैमान घालूं लागतो. या वेळीं प्रत्यक्ष माझी आई जरी माझ्यासमोर उभी राहिली, तरी तिचे पाय धरण्यासाठीं पुढं झालेले माझे हात तिच्या मानेवर करकचून आंवळले जातील. मीं अनाथाश्रमांत राहावं, दुसऱ्यांनीं दाखविलेल्या पोकळ सहानुभूतीवर जगावं, आश्रमाला भेट देणाऱ्या लोकांनीं आमच्याकडं पाहून दुःखोद्गार काढावेत, हा प्रकार पाहून माझं मन अगदीं कळंजून गेलंय्. कोणतं पाप आम्हीं केलंय् म्हणून साऱ्या जगानं आमच्याकडे हेटाळणीच्या दृष्टीनं बघावं ? आमच्या या वाईट परिस्थितीला कारण कोण ? सुरेन, नीट ऐक. या सर्वांना कारणीभूत—आई ! केवळ आईच !

**शांता०** : ( अस्वस्थतेनें ) डॉक्टर, पुढं बोलूं नका. ऐकवत नाहीं हें ! कसलं भयंकर चित्र उभं केलंत तुम्हीं !

**कैलास** : भीति वाटली तुम्हांला ?

**सुरेन** : नाहीं तर काय होईल रे ? माझ्यासुद्धां अंगावर शहारे उभे राहिले.

**कैलास** : असला भेकडपणा काय कामाचा ? डॉक्टर आहे मी. माणसं फाडायला माझे हात कसलेले आहेत आणि अंतःकरणं फाडायला माझे विचार सरावलेले आहेत.

**शांता०** : आतां बसवत नाहीं मला. आंत जाऊन पडतें मी.

**कैलास** : माझा सहवास तुम्हांला नको असेल तर जातों मी. कारण हें असल्या विचारांचं विष माझ्या रोमरोमांत इतकं भिनलेलं आहे, कीं माझ्या सहवासांत कुणीहि आलं तरी त्याच्यावर या विषाचा परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं. ( उठतो. ) नाइलाज आहे माझा.

**शांता०** : तुम्ही उठूं नका डॉक्टर. बराच वेळ मी बसलें म्हणून पाठीला जरा कळ लागलीय्.

**सुरेन** : मग आतां जास्त वेळ बसूं नकोस. आंत जा बरं तूं.

**शांता०** : ( उठून जात ) चहा घेतल्याशिवाय जाऊं नका बरं डॉक्टर !

[ जातात. ]

**सुरेन** : डॉक्टर, माझ्या आईची प्रकृति गेलीं पांच-सहा वर्षं बरी नाहीं. तिला काय होतंय् तेंच समजत नाहीं. सारखीं औषधं चालूं आहेत. पण गूण मुळींच नाहीं. तूं पहाशील का तिची प्रकृति?

**कैलास** : मी म्हणजे कुणी धन्वन्तरी नव्हे. मी तरी ऐन वेळीं कसला उपचार करणार ?

**सुरेन** : तसं नव्हे. तुझा हात फार यशस्वी आहे—

**कैलास** : असं लोकांना वाटतं. म्हणून माझ्या स्वभावाला नांवं ठेवणारे लोकसुद्धां माझ्या पायांखालीं पैशाच्या पायघड्या पसरून मला पाचारण करतात.

**सुरेन** : माझं म्हणणं तुला ऐकायचं नाहीं का ?

**कालिंदी** : डॉक्टर, आईसाठीं तिळ तिळ तुटणाऱ्या मनाची तुम्हांला कांहींच कल्पना येत नाहीं का ?

**कैलास** : कुणाचं म्हणणं ऐकायचं आणि कुणाचं नाहीं हा माझा प्रश्न आहे. सुरेन, एका डॉक्टरचं औषध चालूं असतांना दुसऱ्या डॉक्टरनं त्यांत ढवळाढवळ करूं नये, असा आमच्या धंद्याचा शिरस्ता आहे.

**सुरेन** : आम्ही बाबांना सांगून दुसऱ्या डॉक्टरचं औषध बंद करतों.

**कैलास** : तसं करूं नकोस.

**सुरेन** : कां ? डॉक्टर, तूं मला रक्तदान करून जिवदान दिलंस म्हणून तुझं आणि माझं रक्ताचं नातं जुळलं. तुझा माझ्यावर जसा अधिकार

आहे, तसाच माझा तुझ्यावर अधिकार आहे. तूं तर फार लहरी आहेस. तूं नाहीं म्हणालास तर मला वाईट वाटेल. यापेक्षां काय बोलणार मी ?

**कैलास** : ठीक आहे. सुरेन, मला वाटेल त्या वेळीं तपाशीन मी तुझ्या आईला.

**सुरेन** : मग हरकत नाहीं. ती अगदीं खडखडीत बरी झाली पाहिजे.

**कालिंदी** : डॉक्टर, अतिशय उपकार होतील आमच्यावर. माझ्या मनांतसुद्धां फार दिवस हेच विचार होते. पण ज्वालामुखीवर उभं राहायचं कुणीं ?

**कैलास** : याचा अर्थ असा कीं, मी फार वाईट आहें.

**कालिंदी** : तुम्हांला वाईट कोण म्हणेल ? पण सागराच्या तळाप्रमाणं तुमच्या अंतःकरणाचा ठावच लागत नाहीं.

**सुरेन** : डॉक्टर, तुझा आणि माझा परिचय झाल्यापासून मीं तुला मित्र मानलं—अगदीं भावाप्रमाणं प्रेम केलं तुझ्यावर; पण तुझी वागणूक फार तिऱ्हाइतासारखी वाटली मला. दवाखान्यांतल्या कामाशिवाय तूं नेहमीं एकलकोंडेपणानं वागतोस. फिरायला जाणं नाहीं, चारचौघांत मिसळणं नाहीं. असला उद्वेग आणि संन्यास या वयांत तुला शोभत नाहीं.

**कैलास** : सुरेन, माझ्या अंतःकरणाच्या दारावर असल्या विचारांचे धक्के मारूं नकोस. त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. जगांत मीं दोनच माणसांना मित्र मानलं. ते म्हणजे एक हरबा आणि दुसरा तूं. मी अनाथाश्रमांत असतांना हरबा नेहमीं येऊन माझी चौकशी करीत असे. मी मुंबईला गेल्यावरसुद्धां तो माझ्या भेटीला येई. बाप ज्याप्रमाणं मुलावर लक्ष ठेवतो त्याप्रमाणं त्यानं माझ्यावर लक्ष ठेवलं. परंतु त्याच्या या वर्तनाचा मला अजून उलगडा झालेला नाहीं. आणि तोहि कांहींच सांगायला तयार नाहीं. दुसरा मित्र म्हणजे तूं. रेखा आणि मी एकाच अनाथाश्रमांत वाढलों. अजूनहि आम्ही एकत्र आहोंत. तिच्या जीवनाची जबाबदारी माझ्यावर आहे. रेखाचं तुझ्यावर प्रेम आहे. तुम्हां दोघांना जन्मभर सुखानं संसार करतां यावा अशी माझी इच्छा आहे. म्हणून

तुमच्या मार्गांत जर कुणी कांटे पसरण्याचा प्रयत्न केला तर ते दूर करण्यासाठीं डोळ्यांत तेल घालून मला सावध राहिलं पाहिजे. बस्स् ! यापेक्षां माझ्या आयुष्याच्या खोल दरींत जास्त डोकावण्याचा प्रयत्न करूं नकोस. तसा प्रयत्न केलास तर तूं पार गडगडत खालीं जाशील.

**सुरेन** : नेहमींच तूं असं कांहीं तरी गूढ बोलतोस. आतां मी तुला जास्त विचारीत नाहीं. रेखा, चल आपण आईकडे जाऊं. आतां तीच तुझी आई होणार आहे. ( रेखा, सुरेन निघतात. मागोमाग कालिंदी जाऊं लागते. ) अग, तूं थांब कीं इथंच. आम्ही आंत गेल्यावर डॉक्टरशीं कोण बोलणार ?

**कैलास** : एकटं बसण्याची मला चांगली संवय आहे.

**सुरेन** : ती तुझ्या बंगल्यांत ! इथं नाहीं चालणार तसं. अरे हो ! या सगळ्या गडबडींत विसरलोंच कीं ! बाबा कुठं गेलेत ?

**कालिंदी** : ते चंदनगडच्या राजेसाहेबांना भेटायला गेलेत.

**सुरेन** : हो ! तें माझ्या लक्षांतच राहिलं नाहीं. बरं, डॉक्टर, आम्ही जातों. ( कालिंदीस ) तुम्ही बसा. ( रेखासह जातो. )

**कालिंदी** : ( क्षणाच्या गंभीर शांततेनंतर ) डॉक्टर, तुम्ही आज प्रथम आमच्या घरीं आलांत, मला किती तरी आनंद झालाय्.

**कैलास** : ( निर्विकारपणानें ) ठीक आहे.

**कालिंदी** : डॉक्टर, स्त्रीजातीबद्दल तुमचं मन फार कलुषित झालेलं दिसतंय्. जगांत चांगली आई नाहीं असं का तुम्हांला वाटतं ?

## पद २ रें

**जगतीं वंद्य असे माता ॥ धृ० ॥**
**हृदयीं भरला कुंभ सुधेचा**
**नयनीं नंदादीप प्रीतिचा**
**भाव सांठला मानवतेचा**
**त्रिभुवन चरणीं ठेवित माथा ॥ १ ॥**

**कैलास** : तो विचार करण्याचं मला कारण नाहीं. माझ्या आईनं माझा त्याग केला नसता, मला मोठं करण्यासाठींच स्वतःचं आयुष्य झिजवलं असतं, तर कालिंदी, माझ्या छातीचा कोट करून मीं तिचं सगळ्या संकटांपासून रक्षण केलं असतं. पण– माझा– (अस्वस्थतेनें) नकोच तो विचार !

**कालिंदी** : कैलास, कसला विचार करीत असतां तुम्ही नेहमीं ?

**कैलास** : हरवलेलीं सुखं शोधीत असतों मी. पण कालिंदी, असं वाटतं, तीं सुखं मिळविण्यासाठीं मला मरणाच्या दारांतून पलीकडं जावं लागेल.

**कालिंदी** : तुमच्या मनांतली तळमळ तुम्ही दडपून टाकण्याचा प्रयत्न करतां. तुम्हीं माझ्या भैय्याला वांचविलंत; यशस्वी डॉक्टर म्हणून तुम्ही कीर्ति मिळविलीत; आणि आतां जिवाचं असं वैराणवाळवंट कां करतां ? सुख मिळणार नाहीं असं कां म्हणतां? डॉक्टर, हे विचार सोडून द्या. तापलेल्या जमिनीवरच बाग फुलतो.

**कैलास** : त्या बागेंतल्या फुलांची हांव तुम्ही धरावी. पण असल्या फुलांचे ताटवे उध्वस्त करण्यासाठीं माझे हात नेहमीं शिवशिवत असतात. माझ्यावर जो जुलूम झालाय् त्यामुळं माझे डोळे रक्ताळलेत आणि मला सर्वत्र भयाण दिसतंय्.

**कालिंदी** : पण कैलास, माझ्या भावनेला तुमच्या आयुष्यांत कांहींच मोल नाहीं का ?

**कैलास** : भावना ! भावना हा शब्द कशाला वापरतेस ? प्रेम म्हण हवं तर. तुझ्या भावनेचं मोल मी सांगूं का ? ऐकतांना भीति वाटेल तुला ! तुझी भावना म्हणजे स्मशानाशेजारीं बहरलेली वेल आहे. सरणामधून उफाळणाऱ्या आगीच्या आचेनं ही वेल केव्हां करपून जाईल याचा नेम नाहीं. म्हणून सांगतों तुला, वेळींच माझ्यापासून दूर रहा. नाहीं तर पश्चात्ताप होईल तुला.

**कालिंदी** : तुम्ही असं बोलूं लागलांत म्हणजे माझ्या अंतःकरणांत कालवाकालव होते. कैलास, मीं तुमच्यावर तुमच्या अलौकिक गुणांवर आणि तुमच्या असल्या विचित्र स्वभावावरहि प्रेम केलं. मला विश्वास आहे, कीं मी तुमच्या जीवनांत नंदनवन निर्माण करीन.

**कैलास :** तूं नंदनवन निर्माण केलंस आणि तें क्षणांत उध्वस्त झालं तर तुझ्या मनाला ज्या यमयातना होतील त्या तुला सहन होतील का? तूं माझ्यावर प्रेम करतेस हें सुरेन आणि रेखाशिवाय कुणालाहि माहीत नाहीं. या प्रेमाला मीं कधींहि उत्तेजन दिलेलं नाहीं. इतकं असूनसुद्धां कालिंदी, तूं आपल्या मनाला आंवरीत नाहींस. कालिंदी, अगोदरच माझ्या हृदयाची चिरफाड झालेली आहे, त्यावर तूं मीठ कां चोळतेस ?

**कालिंदी :** काय बोलतां तुम्ही हें? घरे पडतात हो काळजाला हें ऐकून ! असले विचार तुम्हांला नाहींसे करतां येणार नाहींत का ?

**कैलास :** ऑपरेशनच्या टेबलावर चार लोकांचे प्राण घ्यायला सांग मला तूं; परंतु ही गोष्ट माझ्या हातून कदापीहि घडणार नाहीं. माझा नांव-लौकिक मी माझ्या मनगटाच्या सामर्थ्यावर मिळविलेला आहे. आणि ही कर्तबगारी कमावतांना माझं मन करपून गेलंय्. कालिंदी, सैतानाची संगत सुखाची नसते.

**कालिंदी :** तुमच्याबरोबर मला वाद घालतां येणार नाहीं. पण माझं प्रेम एका अंशानंहि कमी होणार नाहीं हें लक्षांत ठेवा. तुमच्या अंत:-करणांतली माणुसकी जागी होईल त्याच वेळीं मला समाधान मिळेल.

**कैलास :** तें समाधान मिळवितांना तुझेहि डोळे रक्ताळतील. पाणी पाणी होईल त्या रक्ताचं !

**सुरेन :** ( प्रवेशून ) अरे ! अरे ! असं रक्त, पाणी, काय बोलताय् काय तुम्ही ! मला वाटलं प्रेमाचं गुंजन ऐकूं येईल. पण इथं तर आक्रंदन ऐकूं आलं ! डॉक्टर, पाण्यानं दगडाची छाती फुटते—

**कैलास :** पण माझ्या अंतःकरणाला पाझर फुटणार नाहीं. ( थोड्या वेळानें ) बराच वेळ बसलों मी इथं—

**सुरेन :** तसाच आणखी थोडा वेळ थांब बाबा परत येतील तोंपर्यंत—

**कैलास :** त्यासाठीं मी इथं आलों नाहीं. तुझ्या परीक्षेचा निकाल समजला; आतां रेखाच्या परीक्षेचा निकाल ऐकायचा आहे.

**सुरेन :** आलं लक्षांत. तोहि निकाल तुझ्या मनासारखा लागेल.

**कैलास :** भविष्यकाळ माणसाच्या हातांतलं खेळणं झाला असता तर जगांतला प्रयत्नवादच नाहींसा झाला असता. मनासारखा निकाल लागेल अशी जर मला खात्री असती तर मीं या घरांत पाऊलच टाकलं नसतं.

**सुरेन :** कांहीं तरी कल्पना करून घेतली आहेस तूं ! आमच्या लग्नांत कोण अडथळा आणील ? ( पडद्यांत बाबासाहेब हांका मारतात–' हरबा, अरे हरबा ! ' ) बाबा आले वाटतं ! [ बाबासाहेब व काळे प्रवेश करतात. काळ्यांच्या डोक्यावर पगडी असते. ] बाबा, हे डॉक्टर कैलास—

**बाबा० :** ओ हो हो ! नमस्कार डॉक्टरसाहेब !

**कैलास :** नमस्कार !

**काळे :** डॉक्टर कैलास, तुम्ही इथं कसे ? बाबासाहेबांच्या कुटुंबाची तब्येत बघायला आलां वाटतं ? ( कैलास तुच्छतेनें बघतो. काळे पुटपुटत– ) काय विक्षिप्त माणूस आहे ! बाबासाहेब, आज राजेसाहेबांची मुलाखत जरा लौकरच आटोपली, नाहीं का ? ( कालिंदी जाते. सुरेन रेंगाळत जातो. )

**बाबा० :** हो ऽ ! बसा काळे. ते दुसरे पाहुणे संस्थानिक आले होते ना, म्हणून जरा आटोपतं घ्यावं लागलं.

**काळे :** तुम्ही त्यांच्यासमोर माझा खूपच गौरव केलांत, बरं का ! मी मात्र शरमून गेलों अगदीं.

**बाबा० :** तें आमचं कर्तव्यच होतं. तुमचा गौरव करायचा नाहीं तर मग कुणाचा करायचा ? घरांतल्या गड्याचा ? अहो, तुम्ही असे उभे कां ? बसा कीं मिस्टर काळे.

**काळे :** ( गंभीरपणें ) नाहीं, मी उभा आहें तोंच ठीक आहे.

**बाबा० :** का हो ?

**काळे :** ही पगडी घातल्यामुळं मला बसावंसं वाटतच नाहीं. सारखं उभं राहावंसं वाटतंय्. काय मान आहे ! काय सन्मान आहे ! तुम्ही माझा गौरव केलांत तो ऐकून मला निराळंच वाटूं लागलंय्. माझ्या डोक्यावर जें मोठेपणाचं ओझं पडलंय् तें या पगडीमुळं पेलून धरतां आलंय् मला.

**बाबा० :** तर मग थोडा वेळ पगडी काढा. द्या माझ्याजवळ.

**काळे :** छे! छे! छे! आतां पगडी उतरायची नाहीं. एक वेळ मान तुटेल पण पगडी निघणार नाहीं! अहो, पगडी घालूनच झोंपायचं ठरवलंय् मी.

**बाबा० :** वा! वा! पण बसाल तर खरे! थांबा हं. मी आलोंच कपडे काढून. [ जातात. ]

[ हरबा धापा टाकीत प्रवेश करतो आणि कैलासाचे पाय धरूं लागतो. ]

**कैलास :** काय रे हरबा, काय झालं?

**हरबा :** डागदर, डागदर! ( धापा टाकतो. )

**कैलास :** असं काय करतोस? कसं आहे तुझ्या नातवाचं?

**हरबा :** त्येला दरदरून घाम फुटलाय्!

**कैलास :** घाम आला? तुझा नातू यमाच्या तडाख्यांतनं वांचला!

**हरबा :** त्येंच सांगाया धांवत दवाखान्यांत ग्येलों, पन तुमी हतं हाय असं कळलं तवां तसाच धांवत आलों. डागदर, माझ्या चिमन्याचा परान तुमीं वांचिवलांत, कसं उपकार फेडूं तुमचं? तुमी देवावानी धांवला, माझ्या बाळाला अमृत पाजलंत् आन् त्येला जगवलंत! डागदर—( पाय धरूं लागतो. )

**कैलास :** हरबा, माझे पाय धरूं नकोस. तुझा नातू जगला यांत मीं काय केलं? पाय धरायचेच असले तर देवाचे धर. त्यानंच तुझ्या नातवाला जीवदान दिलं.

**हरबा :** डागदर, तुमी काय बी म्हना, पन तुमच्या पायावर डुई ठिवल्याबिगर मी न्हाई ऱ्हायचा. तुमीच माजं देव! माज्या बाळाला तुमच्या पायावर घातलं न्हाई तर या म्हाताऱ्या जिवाला बरं न्हाई वाटायचं, डागदर—— [ पाय धरूं लागतो. कैलास उठवतो. ]

**कैलास :** हरबा, माझ्या वडिलांच्या ठिकाणीं मीं तुला मानलंय्. बापानं मुलाचे पाय धरायचे नसतात. तुझ्या डोळ्यांत हीं आंसवं? कां? तुझी पुण्याई बळकट म्हणूनच तुझा नातू वांचला. पूस तीं आंसवं!

( स्वतःच्या रुमालानें त्याचे डोळे टिपतो. )

**हरबा :** डागदर, तुमचं मन आभाळावानी मोठं हाय. अंत न्हाई लागत त्येचा—

**कैलास :** पुढं बोलूं नकोस. जा. ही आनंदाची बातमी तुझ्या मालकिणीला सांग. [ हरबा जातो. ]

**काळे :** म्हणजे डॉक्टर, तुम्ही हरबाच्या नातवाला औषध देत होतां तर !

**कैलास :** कां हो ? आश्चर्य वाटलं तुम्हांला ?

**काळे :** पैशाशिवाय तुमचं पाऊल उचलत नाहीं. तुम्हांला बोलवायचं म्हणजे अगोदर छन् छन् रुपये मोजावे लागतात. तुम्हांला पैशापुढं कांहींच दिसत नाहीं असा तुमचा लौकिक ! मग तुम्ही हरबाच्या घरीं गेलां कसे ?

**कैलास :** माझा लौकिक तुम्ही उघड बोलून दाखविलांत त्याबद्दल मी तुमचा फार आभारी आहें. पण मरणाच्या दाढेंत रगडल्या जाणाऱ्या माणसांना मी मागें खेंचून आणतों ही माझी कीर्ति तुम्हीं नाहीं सांगितली.

**काळे :** ही कीर्ति आहेच. पण हे असले गरीब दरिद्री लोक तुमची जबर फी कशी देतात ? का त्यांचीं घरंदारं फीच्या मोबदल्यांत लिहून घेतां ?

**कैलास :** तुमचं मनच दरिद्री आहे. श्रीमंत लोकांजवळ पैसा असतो पण अंतःकरण नसतं, म्हणून तुमच्यासारखे धनवान् लोक फी म्हणून मला पैसा देतात. गरीब लोकांजवळ पैसा नसतो पण अंतःकरण असतं, म्हणून हरबासारखे गरीब लोक मला फी म्हणून अंतःकरण देतात.

**काळे :** काय लाखांतलं बोललांत ! डॉक्टर, माझ्या आईची प्रकृति अलीकडे जरीच बिघडलीय्. तिला तपासून सल्ला द्याल का ?

**कैलास :** माझा सल्ला तुम्हांला पाहिजे अं ! परंतु त्याप्रमाणं तुम्ही वागणार आहांत का ?

**काळे :** हें काय विचारतां ? तुमच्या सल्ल्याची करामत दुसऱ्याला शक्य तरी आहे का ?

**कैलास :** नीट विचार करा; नाहीं तर माघार घ्याल. कारण कोणताहि डॉक्टर माझ्यासारखा सल्ला देणार नाहीं.

**काळे :** छे ! छे ! तुम्हीं सांगावं आणि आम्ही ऐकावं.

**कैलास :** ठीक. ( विचार करून ) का हो काळे, तुमची बहीण कुठं आहे ?

**काळे :** माझी बहीण–( उसासून ) डॉक्टर, तीन महिन्यांपूर्वी ती एकाएकीं वारली हो ! ( डोळे टिपीत ) किती चांगली होती हो ती ! तिची आठवण झाली कीं कसं भडभडून येतं मला—

**कैलास :** अस्सं ! ती मेली म्हणून खरंच वाईट वाटतं तुम्हांला ?

**काळे :** ( हेल काढून ) किती चांगली होती हो ती ! पण मला दुःखांत लोटून ती गेली हो !

**कैलास :** ( कोरड्या सुरांत ) काळे, हें रडण्याचं सोंग कशाला सजवतां ? माझा सल्ला तुम्हांला पाहिजे ना ? मग मी काय सांगतों तें नीट ऐका. तुमची बहीण ज्या मार्गानं गेली, त्याच मार्गानं तुमच्या आईला जाऊं द्या !

**काळे :** ( आश्चर्यानें ) म्हणजे ? मला नाहीं समजलं !

**कैलास :** तुम्हांला समजेल अशा भाषेंत सांगूं का ? तुम्ही आपल्या आईवर विषप्रयोग करा ! समजलांत ?

**काळे :** काय ? बोलतांय् काय तुम्ही ?

**कैलास :** असला सल्ला कोणताहि डॉक्टर तुम्हांला देणार नाहीं. तुमच्या आईचं स्त्रीधन म्हणून तीस हजारांची संपत्ति आहे. स्त्रीच्या वारसाहक्कानं ती तुमच्या बहिणीला मिळाली असती. एवढी मोठी संपत्ति दुसऱ्याच्या घरांत जाऊं नये म्हणून तुम्ही तिच्यावर विषप्रयोग केलांत. आतां राहतां राहिली म्हातारी आई ! कशाला त्या म्हातारीला जास्त दिवस जगवतां ?

**काळे :** डॉक्टर, कसला आरोप करतां आहांत तुम्ही माझ्यावर ? लोकांच्या अफवांवर विश्वास ठेवून तुम्ही वाटेल तें बरळत आहांत. तुमच्या म्हणण्याला पुरावा काय ?

**कैलास :** पुराव्याचं भूत तुमच्यासमोर उभं राहिलं तर तें उलटं टांगील तुम्हांला मिस्टर काळे ! तुमच्या बहिणीच्या प्रेताचं पोस्टमॉर्टेम झालं त्या वेळीं मी समक्ष हजर होतों. तिच्या पोटांत कोणतं विष गेलं होतं त्याचं नांव पुराव्यासाठीं सांगूं का तुम्हांला ? आणि तें प्रकरण पोलिसामार्फत धसाला लागूं नये म्हणून तुम्हीं कसलीं कुटिल कारस्थानं केलीं त्याचा पाढा वाचूं का तुमच्यासमोर ?

**काळे** : ( अगतिकतेनें ) डॉक्टर, आतां पुढं बोलूं नका.

**कैलास** : म्हणून म्हणतों, त्या म्हातारीवर विषप्रयोग केलांत तर तुमचं काम फारच सोप्या रीतीनं आटपेल, बरं का मिस्टर काळे !

**काळे** : ( अस्वस्थपणें रुमालानें वारा घेत ) बाबासाहेब, अहो, बाबासाहेब, मी जातों आतां.

**बाबा०** : ( गडबडीनें प्रवेशून ) असं कुठं झालंय्! इतक्या लवकर कसे जातां ? मी जरा कागदपत्र चाळीत होतों. अहो, आपल्या व्यवहाराबद्दल बोलायचंय् ना ?

**काळे** : तें उद्यां बोलूं. ( कैलासकडे पहात ) कारण–कारण आजचा व्यवहार फारच कडक झालाय् !

**बाबा०** : अहो, पण पगडीसुद्धां काढली नाहीं अजून तुम्ही ?

**काळे** : अहो, पगडी कसली काढतां, बाबासाहेब ! चांगलीच उडाली ती ! मला आतां थांबवूं नका. जातों मी.

**बाबा०** : असं म्हणतां ? मर्जी तुमची.

**काळे** : ( घाईनें जातांना ) जय सुधारणा ! [ जातो. ]

**बाबा०** : बरं का डॉक्टर, फार श्रीमंत आणि फार विनोदी माणूस ! आवडला बुवा आपल्याला. माणूस असावा तर असा असावा !

**कैलास** : मलाहि फार आवडला. माणूस असावा तर असा असावा.

**बाबा०** : होऽऽ ! सुरेनचा निकाल विचारायचा राहिला. सुरेन, अरे सुरेन—

**सुरेन** : ( प्रवेशून ) काय बाबा ?

**बाबा०** : काय लागला परीक्षेचा निकाल ?

**सुरेन** : तेंच मघांपासून सांगणार होतों. पण तुम्ही गडबडींत होतां. बाबा, पहिल्या वर्गांत पास झालों मी.

**बाबा०** : ( आनंदानें ) काय म्हणतोस ? पहिल्या वर्गांत पास झालास ? सुरेन, नांव राखलंस माझं तूं ! अरे, पेढे आणले नाहींत का ? हरबा कुठाय् ?

**सुरेन** : आतांच आलाय् तो. हरबा—

**हरबा** : ( प्रवेशून ) जी धनी—

**बाबा०** : कसं आहे तुझ्या नातवाचं ?

**हरबा** : आतां वाइच आराम पडलाय् त्येला.

**बाबा०** : ठीक ! आत्तांच्या आत्तां जा आणि पेढे देऊन ये. ( पैसे देतात.)

**हरबा** : आनतों धनी. [ जातो. ]

**सुरेन** : तुम्ही रागावणार नसाल तर आणखी एक सांगायचंय्.

**बाबा०** : या वेळीं मी तुझ्यावर कसा रागावेन ! कांहीं संकोच धरूं नकोस.

**सुरेन** : रेखा, अग रेखा, बाहेर ये. (रेखा येते.) रेखा, हे माझे वडील. बाबा, ही रेखा– तुमची– भावी ( घुटमळतो. )

**बाबा०** : ( हंसून ) सुरेन, बराच लबाड झाला आहेस कीं ! आलं लक्षांत ! ( रेखाकडे पहात ) छान ! सुंदर ! काय रे, कुणाची ही मुलगी ? हिचे आईबाप कुठं असतात ? काय करतात ?

**सुरेन** : बाबा, तें सगळं मागून सांगेन तुम्हांला.

**बाबा०** : कांहीं हरकत नाहीं. डॉक्टर, आज मी अगदीं सुखांत आहें. माझ्या सुधारणामंडळाची इमारत उभी होणार, माझा सुरेन पहिल्या वर्गांत वकील झाला, आणि हिच्यासारखी सूनहि घरांत येणार. आज माझ्या आनंदाला पारावार नाहीं.

**कैलास** : ठीक आहे. सुरेन जातों मी.

**बाबा०** : वा ! वा ! डॉक्टर, तुमचे उपकार मी ओळखून आहे. बसा ना थोडा वेळ. तोंड गोड केल्याशिवाय मी तुम्हांला इथनं जाऊं देणार नाहीं आज.

**कैलास** : तुम्ही सर्वजण आनंदांत आहांत. इथं मी जास्त वेळ बसलों तर जीव गुदमरेल माझा.

**बाबा०** : म्हणजे ?

**कैलास** : जिथं आनंद आहे तिथं मी फारसा थांबत नाहीं. बाबासाहेब, ज्या वेळीं घरांत आनंद नाचत असतो, त्या वेळीं दारांत दुःख उभं असतं. मला तिकडे गेलं पाहिजे. ( तडफेनें जातो. )

[ सर्वजण विस्मयानें त्यांच्याकडे पाहतात. ]

**पडदा पडतो.**

# अंक दुसरा

[ **स्थळ :** पहिल्या अंकांतील दिवाणखाना. हरबा साफ-सफाई करून आंत जातो. कालिंदी गात प्रवेश करते. ]

### पद ३ रें

**सदनीं माझ्या दीप लागला,**
**भुवनीं तुझिया प्रकाश भरला ॥ ध्रु० ॥**
**अंधेराची पुढती दुनिया**
**दिसे आपुला मार्ग उजळला;**
**तिथें मनोहर कांचन मंदिर,**
**ध्यास तयाचा जडे जिवाला ॥ १ ॥**

[ पद संपतांना हरबा प्रवेश करतो. ]

**कालिंदी :** हरबा—

**हरबा :** जी.

**कालिंदी :** तुझ्या नातवाची प्रकृति कशी आहे ?

**हरबा :** आठ दिवसांमागं त्येला घाम आला, तवापासनं बरं हाय्. ताईसाब, डागदर कैलासनं माज्या नातवाला काळाच्या हातांतनं हिसकावून घेतलं आन् माज्या वट्यांत टाकलं. त्ये व्हतं म्हणून तर माजं प्वार वांचलं !

**कालिंदी :** काय रे, तुझी आणि डॉक्टरांची फार जुनी ओळख दिसते.

**हरबा :** जी, व्हय्. ( अस्वस्थ होऊन ) पन हें कुनालाबी ठावं नव्हतं. तुमास्नी कसं कळलं ?

**कालिंदी :** त्यांनींच सांगितलं हें. कशी ओळख झाली रे तुमची ?

**हरबा :** लई वरसांमागची गोष्ट हाय्. आतां मी म्हातारा झालोंय्. नीट ध्येनांत बी न्हात नाय मागचं. डागदर ज्या अनाथासरमांत न्हात व्हतं,

ततं माजा एक मैतर चाकरी करीत व्हता. तवापासनं मी त्यास्नी वळाकतों. ( पुन्हां अस्वस्थ होतो. )

**कालिंदी** : ( रोखून पहात ) पण हें सांगतांना तुझी चलबिचल कां झाली ?

**हरबा** : छ्या ! छ्या ! त्या मैतराची याद आली म्हणून वाइच वंगाळ लागलं. डागदरसाब आनखीन् काय म्हनालं ?

**कालिंदी** : तुला काय करायचंय् ? म्हणजे तूं कांहीं तरी लपवून ठेवतो आहेस. खरं ना ?

**हरबा** : मी कशाला तसं करीन ? ह्यो म्हातारा आपल्याच अन्नावर पोसलाय् न्हवं !

**कालिंदी** : किती वर्षे झालीं तूं आमच्याकडे नोकरी करतोस ?

**हरबा** : मी—मी—तुमच्या आईसाबांचं लगीन झालं तवापासनं.

**कालिंदी** : त्यापूर्वी तूं कुटं होतास ?

**हरबा** : त्यें नका इचारूं.

**कालिंदी** : कां रे बाबा ?

**हरबा** : माजा पहिला मालक म्हंजी राजा व्हता राजा ! त्येचा बा म्हंजे माज्या बावानी व्हता. त्यो मयत झाल्यावर माज्या मालकानं मला चाकरावानी वागवलं न्हाई, तर येकाच आईच्या लेकरावानी आमी र्‍हात व्हतों. त्येचा माज्यावर लई जीव व्हता. येक येळ त्यो उपाशी र्‍हाइला असता पन मला त्येनं तोंडांतली भाकर चारली असती. ( गहिंवरून ) पर ताईसाब, चांगलीं मानसं देवाला लई आवडत्यात म्हनं. म्हणून त्या तरण्याबांड मालकाला देवानं आपल्या घरीं बोलावून न्येलं आन् काळानं माजं काळीज कापून न्येलं.

**कालिंदी** : तुझा पहिला मालक तरुणपणीं मेला. त्याच्या बायकोचं काय झालं पुढं ?

**हरबा** : ( चांचरत ) ताईसाब, म्होरचं इचारूं नगा. त्यो मालक मेल्यावर मी हतंच आलों. त्या बाईचं म्होरं काय झालं त्यें नाय ठावं मला.

**कालिंदी** : असा चांचरलास कां हें सांगतांना ?

**हरबा** : तसं नव्हं. पन मागचं मढं कशापाई उकराया व्होवं ? ताईसाब, आतां रेखाताई येनार हैत ना ?

**कालिंदी** : हो. झालीच तिची येण्याची वेळ. हरबा, तूं आमच्या घरांतला आधारस्तंभ आहेस असं आई नेहमीं म्हणते. इतका आपलेपणा वाटतो तुझ्याबद्दल. मग एक विचारूं का ?

**हरबा** : इचारा कीं.

**कालिंदी** : सुरेनभैय्यानं लग्नासाठीं रेखाची निवड केलीय्. ही निवड कशी वाटते रे तुला ?

**हरबा** : ह्ये काय इचारनं झालं व्हय् ? आवं नक्षतरासारखी मुलगी ! किती सुंदर, शिकलेली आन् सोभावानं बी लई ग्वाड हाय पगा.

**कालिंदी** : तुला कसा रे कळला तिचा स्वभाव ?

**हरबा** : (हंसून) हा ऽऽ त्तिच्या ! आवं समद्या दुनियेंतल्या धकाधकीच्या मामल्यामंदीं मी म्हातारा झालोंया न्हवं ! आतांशा त्या तुमाकडं येत्यात, मंग त्येंचा सोबाव मला समजनार न्हाय् व्हय् ?

**कालिंदी** : आतां बाबांची परवानगी मिळाली म्हणजे झालं.

**हरबा** : ह्ये काम आदुगर करा. न्हाई तर तुमी जाल म्होरं. आन बाबासाब खेंचत्याल मागं.

**कालिंदी** : हरबा, स्वतःच्या मुलीप्रमाणं तूं माझ्या आईची शुश्रूषा करतोस. त्या दृष्टीनं पाहिलं तर मी तुला नातीसारखी शोभेन, नाहीं का ?

**हरबा** : जी व्हय.

**कालिंदी** : सुरेनची निवड तुला पसंत पडली. माझी– माझी निवड कशी वाटते तुला ?

**हरबा** : आँ ऽऽ ! म्हणजे ? ताईसाब–अं ऽऽ ? कोन हायत त्ये ?

**कालिंदी** : तुला माहीत आहे त्यांचं नांव. सांग बघूं ?

**हरबा** : न्हाइं बा ! तुमी तुमचं ठरवा आन् नांव मला इचारा. चांगला न्याव हाय !

**कालिंदी** : तुला माहीत आहेत ते.

**हरबा :** आत्तां वं ! मला न्हाइं माहीत त्ये ! सांगा बगूं त्येंचं नांव.

**कालिंदी :** ( सलज्जतेनें ) त्यांचं नांव– डॉक्टर कैलास !

**हरबा :** ( एकदम चमकून ) कोन ? डागदर कैलास ? आर् र् र् ? घात झाला ह्यो ! आतां काय म्हणावं या कर्माला ! ( कपाळावर हात मारून घेतो. )

**कालिंदी :** काय झालं रे ?

**हरबा :** ताईसाब, त्या डागदरचं असं नांव घेऊं नका. ह्यो अविचार हाय !

**कालिंदी :** कां ? ते वाईट का आहेत ?

**हरबा :** आवं, त्येंच्यासारखा मानूस समद्या दुनियेंत न्हाई मिळायचा. पन ही आग हाय आग ! ह्या आगीच्या डोंबांत पाय टाकूं नका.

**कालिंदी :** असं काय वेड्यासारखा बोलतोस ?

**हरबा :** तुमी काय बी म्हना पन ह्ये याड हाय याड !

**कालिंदी :** खरंच मी वेडी झाली आहें. माझा विचार मी मुळींच मागं घेणार नाहीं.

**हरबा :** आतां कसं सांगूं तुमाला ? काय सांगूं ? ह्यो विचार लई वंगाळ हाय, खराब हाय ! आवं ऽ ऽ, जळत्या निखाऱ्यावर तुमी उभं ऱ्हातायसा. ताईसाब, न्हाई ऐकनार तुमी माजं ? आतां मला डागदरकडंच गेलं पायजे. [ झपाट्यानें निघून जातो. ]

**कालिंदी :** ( चिंतेनें ) असं कां बरं बोलला हरबा ? डॉक्टरांचा विचित्र स्वभाव पाहून याचं मत बिघडलं असावं का ? पण तो फार विचारी माणूस आहे. विनाकारण तो वाटेल तें बोलणार नाहीं. डॉक्टरना तो आग म्हणाला, जळता निखारा म्हणाला. कां बरं असं म्हणाला तो ? छे, छे ! तो चुकत असला पाहिजे. अंगाला राख फासून शंकर स्मशानांत बसत होता, तरी पार्वतीनं त्यालाच वरलं. डॉक्टर कैलास ! कैलास ! तुमचं नांव उच्चारतांच मन कसं आनंदानं फुलून जातं !

## पद ४ थें

**वेड लाविशी उगा जिवाला ॥ धृ० ॥**
**तुझिया दारीं आलें राया,**
**वाट पाहुनी शिणली काया,**
**झुरतें मी तर तुझीच छाया,**
**बघसी माझा अंत कशाला ॥ १ ॥**

**रेखा :** ( प्रवेशून ) काय कालिंदी, तुझा उल्हास अगदीं ओसंडून चाललाय् ?

**कालिंदी :** कांहीं नाहीं. आलें होतें आपली लहरींत !

**रेखा :** पण डॉक्टरांच्या आणि तुझ्या लहरींत फार फरक आहे बरं का ! कालिंदी, आज सकाळपासून डॉक्टर भडकलेत. कुणाशींहि नीट बोलत नाहींत. मी तुझ्याकडे जातें म्हणून सांगितलं, तर वाटेल तें कर म्हणून माझ्यावर ओरडले.

**कालिंदी :** कांहीं तरी तसंच कारण झालं असेल भडकायला.

**रेखा :** झालंय् खरं तसं. एका विधवा बाईनं नुकत्याच जन्मलेल्या आपल्या मुलाला गळा दाबून ठार मारलं. तें समजल्यापासून त्यांचं पित्त खवळलंय्.

**कालिंदी :** असला प्रकार पाहून कोण संतापणार नाहीं ? साहजिकच आहे तें.

**रेखा :** त्यांना शांत करण्याचा मीं पुष्कळ यत्न केला, पण व्यर्थ ! कालिंदी, त्यांचा स्वभाव कसा आहे तेंच समजत नाहीं. अनाथाश्रमांत असल्यापासून त्यांचा चमत्कारिक स्वभाव मी पहातें आहें. पुढं एकदां मुंबईचा एक धनाढ्य गृहस्थ आश्रमाला भेट देण्यासाठीं आला. त्याला मूलबाळ नव्हतं, म्हणून त्यानं मला आणि डॉक्टरना मुंबईला नेलं. आम्हां दोघांनाहि लहानाचं मोठं केलं. आमच्या शिक्षणाचा खर्च केला. पुढं तो श्रीमंत गृहस्थ आजारी पडून मरण पावला. कैलासनीं डॉक्टर झाल्यानंतर त्या माणसाचे सर्व पैसे त्याच्या विधवा पत्नीला परत केले. डॉक्टरांना कुणाचे कसलेहि उपकार नकोत. प्राणापलीकडं प्रेम आहे त्यांचं माझ्यावर, पण कधीं शब्दानं बोलून दाखविलं नाहीं त्यांनीं.

**कालिंदी** : काय ग, तूं अनाथाश्रमांत कशी आलीस ?

**रेखा** : तें मला कुणींहि नीट सांगितलं नाहीं. मीं डॉक्टरना विचारलं तर ते म्हणाले, " तुला काय करायचंय् हें समजून ? जोंपर्यंत मी आहें तोंपर्यंत तुला कशाचाहि विचार करण्याचं कारण नाहीं. "

**कालिंदी** : अन् डॉक्टर कसे ग आले तिथं ?

**रेखा** : ते तर कांहींच सांगायला तयार नाहींत. म्हणूनच त्यांच्या आयुष्याचं कोडं उलगडत नाहीं.

**कालिंदी** : कांहीं वेळापूर्वीं हरबा फारच गडबडल्यासारखा दिसला. मीं डॉक्टरांची निवड केली ती कशी आहे म्हणून त्याला विचारलं, तर त्यानं कपाळावर हात मारून घेतला. असं कां ग केलन् त्यानं ?

**रेखा** : हरबा मात्र त्यांच्या भेटीला नेहमीं येत असतो. त्याला डॉक्टरांची माहिती असावी, म्हणून मीं त्याला खूप छेडलं. पण म्हातारा मोठा चाणाक्ष ! कांहीं एक थांगपत्ता लागूं दिला नाहीं त्यानं.

**कालिंदी** : डॉक्टरांचं कांहींच समजत नाहीं. ते हळव्या मनाचे आहेत कीं कठोर अंतःकरणाचे आहेत ? यशस्वी डॉक्टर म्हणून त्यांचा नांवलौकिक पसरलाय्, तसंच पैशासाठीं हपापलेला माणूस म्हणून बदलौकिक पसरलाय्. कांहीं, कांहीं समजत नाहीं. रेखा, माझं कांहीं चुकत तर नाहीं ना ?

**रेखा** : त्यांच्यासारखा जन्माचा जोडीदार मिळायला फार मोठी पुण्याई पाठीशीं उभी असायला हवी. कालिंदी, तूं मात्र नशीबवान् खरी !

## पद ५ वें

**भाग्यवान तूं गमसी मजला ।। धृ० ।।**
**शशांक शीतल गगनीं येतां,**
**प्रेमसागरीं कमलें फुलतां,**
**शृंगाराचें गान पसरतां,**
**आशा वरिते नव तेजाला ।। १ ।।**

[ सुरेन प्रवेशतो. ]

**कालिंदी** : मला नशीबवान् म्हणतेस पण माझ्यापेक्षां तूंच जास्त नशीबवान् आहेस. ( सुरेनला पाहून ) भैय्या, केव्हां आलास तूं ?

**सुरेन** : तुम्ही नशिबाची परीक्षा पहात होतां तेव्हां ! कालिंदी, रेखा, अशाच उभ्या राहा. ( दोघींकडे पहातो. )

**कालिंदी** : काय बघतोस रे भैय्या ?

**सुरेन** : तूं मध्यें बोलूं नकोस. नीट बघूं दे मला. ( रेखाकडे पाहतो. )

**रेखा** : अजून बघणं शिल्लक राहिलंय् वाटतं ?

**सुरेन** : कां बोललीस तूं ? कालिंदी, रेखा, तुमच्याकडे पाहिल्यानंतर माझ्या मनांत एक विचार आला. रेखा, तूं या घरांत संसार करण्यासाठीं येणार आहेस, तर कालिंदी, तूं संसार करण्यासाठीं इथनं बाहेर जाणार आहेस. कालिंदी, या घरामध्यें तूं हंसलीस, नाचलीस, बागडलीस आणि आतां कांहीं दिवसांनंतर हें घर सोडतांना तुला किती वाईट वाटेल ! ही कल्पनाच मुळीं सहन होत नाहीं मला.

**कालिंदी** : नुसता विचार मनांत येतांच तुला इतकं वाईट वाटतंय् ! मग ज्या वेळीं मी जायला निघेन त्या वेळीं काय करशील रे ?

**सुरेन** : म्हणून म्हणतात ना, स्त्रीचा जन्म येऊं नये म्हणून ! परमेश्वरा, पुढच्या जन्मीं मला पाताळांत पाठव पण पातळांत पाठवूं नकोस.

**रेखा** : तुम्हांला थट्टा करावीशी वाटणारच ! पण स्वतःचं घर सोडतांना मुलीच्या मनाला किती यातना होतात याची तुम्हांला कल्पना तरी आहे का ?

**सुरेन** : अरे वा ! रेखा, बरीच बोलतेस कीं तूं ! मी सांगूं का ? त्या यातना, तें रडणं साफ खोटं असतं. सासरीं निघालेली मुलगी हुंदके देत असतांना हंसते. तिला पित्याचं घर नको असतं तर पतीचं घर पाहिजे असतं. पण रेखा, हें असलं रडण्याचं सुख तुझ्या नशिबीं नाहीं. कारण तूं अनाथाश्रमांत राहिलेली, बिनआईबापांची मुलगी ! ( रेखाची मुद्रा कष्टी होते. )

**कालिंदी** : हें काय रे भैय्या ? तिला कां विनाकारण असं टोंचून बोललास ?

**सुरेन** : अरेच्या ! चुकलंच माझं. रेखा, तुला दुखविण्याचा माझा मुळींच हेतु नव्हता. थट्टेनं बोललों मी ! रेखा, चुकून बोललों मी—

**रेखा** : ( दु:खानें ) यांत तुमचा दोष नाहीं. माझंच दुर्दैव !

**सुरेन** : तूं अशी दु:खीकष्टी होऊं नकोस रेखा. अशी रागावूं नकोस. रेखा, हें बघ मीं तुझ्यासाठीं काय आणलंय् ! ( खिशांतून डबी काढतो. )

**कालिंदी** : पाहूं मला—

**सुरेन** : अंऽहंऽ ! तुला नाहीं दाखविणार. ( दोघांच्या हिसका-हिसकींत तो रेखाला डबी देतो. )

**रेखा** : ( डबी उघडून ) अय्या ! किती छान हिऱ्याच्या कुड्या आहेत या ! काय किंमत पडली ?

**सुरेन** : किंमत ? दागिना दाखविला कीं बायका किंमत करायला लागतात. त्या भेटीच्या वस्तूमागें कोणती भावना आहे याचा विचारच त्यांच्या मनांत येत नाहीं ! रेखा, ए, हांस बघूं एकदां ! हं, हांस बघूं ! ( रेखा हंसते. ) हीच या कुड्यांची किंमत ! काय गंमत आहे पहा ! लहान मुलाचं रडं थांबायला त्याला खाऊ द्यावा लागतो आणि बायकांचं रडं थांबायला त्यांना दागिना द्यावा लागतो ! [ सर्व हंसतात. ]

**कालिंदी** : भैय्या, माझ्यासाठीं काय आणलंस रे ?

**सुरेन** : तुझ्यासाठीं–तुझ्यासाठीं– आणलंय् कीं– छकडा !

**कालिंदी** : ( ओरडून ) काय म्हणालास ?

**सुरेन** : कां ओरडतेस उगाच ? अर्थाचा अनर्थ करूं नकोस. तुझ्या लग्नाची वरात मोटारींतनं न काढतां छकड्यांतून काढावी असं मी बाबांना सांगणार आहें. घुंगूर बांधलेले बैल, मारे फत्तार्डीं शिंगं हलवीत पुढं चालले आहेत–छकड्यांत तुम्ही दोघं राजाराणीसारखीं बसलां आहांत–रस्त्यांतल्या खड्ड्यांमुळं एकमेकांवर आदळताहांत—

**कालिंदी** : भैय्या, गप्प बैस बघूं ! पुरे झाला तुझा फाजिलपणा.

**सुरेन** : बरं बुवा ! राहिलं आमचं !

**रेखा** : ( सुरेनला ) केव्हां विचारणार तुम्ही आपल्या वडिलांना ?

**सुरेन** : त्याच संधीची वाट बघतोंय् मी. पण अजून जमलंच नाहीं. बाबा नकार देणार नाहींत याची मला खात्री आहे. तो काळे आणि

आबा सारखं डोक्याला डोकं लावून खल करीत बसले आहेत. बाबा तर कपाशीच्या सट्ट्यांत गुंग झालेत

**रेखा** : मग बरेच दिवस थांबावं लागणार तर !

**सुरेन** : इतके दिवस आपण गुप्त कारस्थान केलं; आतां इतकी घाई कशाला ? पण बाबांना वेळ केव्हां मिळणार तेंच समजत नाहीं.

**कालिंदी** : तूंहि रेखाप्रमाणं हातघाईवर आलेला दिसतोस ?

**सुरेन** : छे ! छे ! मुळींच नाहीं. कालिंदी, हीं बघ तुझ्यासाठीं इयरिंग्ज आणलींत्. ( देतो. )

**कालिंदी** : ( पहात ) बराच आहेस कीं ! किती छान आहेत ! काय रे यांची—

**सुरेन** : किंमत विचारूं नकोस. चोरून आणलींत मीं. मग तर झालं ! रेखा, लौकरच वकिलीची सनद काढण्याचा माझा विचार आहे. म्हणून आतां विचारे वकिलांना भेटून येतो. तसंच डॉक्टरकडे जाऊन आईची प्रकृतीहि तपासायला सांगतों. [ जातो. ]

**कालिंदी** : रेखा, माझा सुरेनभैय्या खेळकर आणि सरळ मनाचा आहे. राहून राहून मला एका गोष्टीचं आश्चर्य वाटतं. तें म्हणजे बाबांच्या आज्ञेंत वागणारे आम्ही, त्यांच्या शब्दाबाहेर जाण्याची आमची प्राज्ञा नाहीं. त्यांच्या धाकाचं एवढं कांटेरी कुंपण आमच्याभंवतीं असतांनाहि तुझं आणि भैय्याचं जमलं. तुम्हीं दोघं प्रेमाच्या पटांगणांत नाचलांत.

**रेखा** : माझ्याविषयीं तूं बोलतेस ! पण स्वतःबद्दल कां बोलत नाहींस ? तुझं डॉक्टरवर प्रेम नाहीं का ?

**कालिंदी** : मी त्यांच्यावर निस्सीम प्रेम करतें. पण रेखा, डोळ्याची पापणी न मिटतां विजेच्या लखलखाटाकडे बघतां येत नाहीं, तसं होतं मला. गपकन् डोळे मिटतात माझे ! रेखा, माझी आतुर आशा सफल होईल का ग ?

**रेखा** : मी डॉक्टरांना सर्व पटवून देण्याचा प्रयत्न करीन. मग तर झालं ? [ काळे प्रवेशून बोलणं ऐकत उभे राहतात. ] काय ग, तो कृष्णराव काळे कशाला ग येतो इथं ?

**कालिंदी** : बाबांच्याकडे त्याचं काम असतं. कां ? ओळखतेस त्याला तूं ?

**रेखा** : मला त्याची विशेष माहिती नाहीं. पण डॉक्टरांना सर्व ठाऊक आहे. त्यांनीं मला बरंच सांगितलंय् त्याच्याबद्दल.

**काळे** : ( पुढें होत ) कुणीं काय सांगितलं माझ्याबद्दल ? ( दोघी चपापतात. ) जय सुधारणा ! हं ऽ ऽ ! माझ्याबद्दल कोण काय बोललं ?

**रेखा** : कांहीं नाहीं. आमचं आपलं खाजगी चाललं होतं.

**काळे** : खाजगी हं ऽ ऽ ! छान ! म्हणजे तुम्ही माझ्याबद्दल खाजगी बोलत होतां तर ! उत्तम ! [ दोघी आंत जाऊं लागतात. ] आंत कां निघालांत ? बाबासाहेब आहेत घरांत ?

**कालिंदी** : बाहेर गेलेत.

**काळे** : ते घरांत असतील म्हणून मी आलों. ते नसले तरी हरकत नाहीं. तुम्ही असलांत तरी चालेल. बसा कीं. इतकं कांहीं लाजायला नको. ते येईपर्यंत आपण गप्पा मारीत बसूं. अजून बसलां नाहींत ? आतां मुली फारशा लाजत नाहींत. त्यांतून मी का कुणी परका आहें ? बसा !

**रेखा** : बैस ग कालिंदी. बाबासाहेब कामाला गेलेत, आणि तुझे भैय्याहि बाहेर गेलेत. तोंपर्यंत आपण पाहुण्यांची नीट बडदास्त ठेवूं. त्यांतून हे पाहुणे बाबासाहेबांचे खास मित्र !

**कालिंदी** : नको गडे. आपल्याला बाहेर जायचंय्. आणि अगोदर मला आईकडे गेलं पाहिजे.

**काळे** : तुमच्या आईच्या आजारीपणाबद्दल मला फार सहानुभूति वाटते.

**रेखा** : बघ कालिंदी, केवढा हा आपलेपणा ! याला म्हणतात माणूस !

**काळे** : नुसता माणूसच नाहीं मी, तर फार श्रीमंत आहें. अहो, बसा ना. उभ्या कां ? छे बुवा ! आम्हीं इथं बसून बोलावं, आणि तुम्हीं उभं राहून ऐकावं, तुमच्या बाबासाहेबांनीं पाहिलं तर काय म्हणतील ते ?

**रेखा** : बैस ग कालिंदी. मोठ्या माणसाचं ऐकावं नेहमीं. [ बसतात. ]

**काळे** : मोठा म्हणजे ? तुम्ही मला म्हातारा समजतां कीं काय ? अहो, माझं अजून पहिलं लग्न व्हायचंय् !

**रेखा** : किती लग्नं करण्याचा विचार आहे तुमचा ?

**काळे** : काय लाखांत प्रश्न विचारलांत ! किती मौज वाटली मला ! किती लग्नं करणार ! पण अजून आमचं पहिल्याच लग्नाचं जमत नाहीं.

**रेखा :** खरं नाहीं वाटत तुमचं बोलणं. तुम्ही श्रीमंत! दानशूर! अनाथ लोकांचे वाली! त्यांतून निराधार बायकांना तुमचा मोठा आधार! ( काळे प्रत्येक शब्दाला ' हाँ! हाँ! ' करतो. )

**काळे :** काय लाखांत बोललांत! तुमच्या या बोलण्याचा मला मुळींच राग आला नाहीं. उलट असल्या विनोदाचं कौतुक वाटलं मला! वा! मजा वाटली! छान! उत्तम!

**रेखा :** कालिंदी, आपल्याला बाहेर जायचंय् ना?

**काळे :** म्हणजे? मी एकटाच बसूं कीं काय?

**रेखा :** आम्हांला कांहीं खरेदी करायचंय्. काल आम्हीं एक फ्लॉवर-पॉट पाहिलंय्.

**काळे :** फ्लॉवर-पॉट! म्हणजे फुलपात्र कीं पंचपात्र?

**रेखा :** पंचपात्र नव्हे फुलदाणी. फारच आवडली मला ती.

**काळे :** फुलदाणी? कसली आहे ती? तांब्याची का पितळेची?

**रेखा :** कांचेची आहे ती. किती छान नक्षी आहे तिच्यावर! किती नाजूक दिसत होती ती! या दिवाणखान्यांत ठेवली तर शोभा वाढेल इथली.

**काळे :** पण ती कांचेची आहे ना? मग तिचा कांहीं उपयोग नाहीं. अहो, कांचेचा माल शोभिवंत दिसतो खरा, पण फार तकलुपी! केव्हां फुटेल त्याचा नेम नाहीं. मी तर तांब्या-पितळेशिवाय कांहीं वापरीत नाहीं. फार काय, कपबशासुद्धां पितळेच्या असतात! एकदां घेतल्या कीं पुन्हां खर्च करायला नको.

**रेखा :** तुम्ही जसे दानशूर आहांत तसे काटकसरी आहांत कीं!

**काळे :** काय लाखांत बोललांत! अहो, काटकसरी कशाला म्हणतां! चिक्कू म्हणा कीं! बाकी तुम्ही मला चिक्कू म्हणालांत तरी मी मुळींच रागावणार नाहीं. हाँ ऽ ऽ! माझा स्वभाव तसा फार खेळाडू आहे.

**कालिंदी :** चल बाई, उशीर करूं नकोस. मी आईला सांगून आलेंच हं.

**रेखा :** लवकर ये. [ कालिंदी जाते. ] धनी काळे, वर्तमानपत्र देऊं का वाचायला? फारच चांगल्या बातम्या आहेत आज. ( वर्तमानपत्र घेऊन ) एका कुळानं सावकाराचा खून केला—एका व्यापाऱ्याला गांवकऱ्यांनीं लुटलं,

त्याचे कागदपत्र जाळले—एका सट्टेबाजानं सट्ट्यांत बुडाल्यामुळं आत्महत्त्या केली—वाचा या बातम्या. तेवढीच करमणूक होईल.

**काळे** : आणा इकडं. ( वर्तमानपत्र खस्कन घेतो. कालिंदी पर्स घेऊन येते. दोघी निघतात. दाराजवळ आल्यावर रेखा ‘ जय सुधारणा ’ म्हणते. ) जय सुधारणा ! ( दोघी हंसत जातात. ) काय खस्याळ कारटी आहे ! निराधार बायकांचा मी आधार काय ? किती लग्नं करायचीं आहेत म्हणे ! मी चिक्कू काय ? कांचेची फुलदाणी पाहिजे अं ऽ ऽ ! थांब, तुकडे तुकडे उडवतो त्या कांचेचे ! ( बाबासाहेब बाहेरून आंत येतात. ) जय सुधारणा !

**बाबा०** : केव्हां आलांत काळे ? ( कपडे काढीत ) माफ करा हं ! थोडा उशीर झाला मला. फार वेळ बसावं लागलं नाहीं ना तुम्हांला ?

**काळे** : छे ! छे ! शिवाय तुमच्या मुलीनं आणि रेखानं चांगलीच करमणूक केली आमची.

**बाबा०** : मग हरकत नाहीं.

**काळे** : नाहीं म्हणजे, रेखा इतकी धीट असेल अशी कल्पना नव्हती.

**बाबा०** : चालायचंच ! स्त्रियांच्या अंगीं धीटपणा आतां बाणलाच पाहिजे. ती तर त्यांच्या उन्नतीची पहिली पायरी. (पाहून) वा ! वा ! काळे, तुम्ही खरंच पगडी घालूं लागलांत कीं ! आणि ही अशीच घालून झोंपलां होतां कीं काय ? पण खरं सांगूं का ? तुम्हांला टोपीच चांगली दिसते.

**काळे** : मी आतां टोप्या विकण्याचं दुकान काढणार आहें.

**बाबा०** : म्हणजे, तुम्ही दुसऱ्याला टोप्या घालणार आणि स्वत: पगडी वापरणार ? धंदा कांहीं वाईट नाहीं.

**काळे** : काय लाखांत बोललांत ! पसंत पडला ना तुम्हांला हा धंदा ! झालं तर. आतां तुमच्यापासूनच सुरुवात करणं बरं. अशी एक सुंदर टोपी तुम्हांला घालायला देईन कीं जन्मभर आठवण ठेवाल माझी ! बरं आपण आतां व्यवहारासंबंधीं बोलूं.

**बाबा०** : माझं काय म्हणणं आहे तें मीं तुम्हांला स्पष्ट सांगितलंच आहे. मी दिलेला शब्द म्हणजे काळ्या दगडावरील रेघ ! प्राण गेला तरी त्यांत फरक पडायचा नाहीं.

**काळे** : फार वाईट आहे हें ! अहो, शब्दासाठीं का प्राण पणाला लावायचे असतात ? तो कौरव-पांडवांचा काळ संपला. आपण आतां कलियुगांत वावरत आहोंत. बाबासाहेब, तुमच्यासारखीं सज्जन माणसं आहेत या जगांत, म्हणून शब्दाला किंमत आहे. पण हें जग माझ्यासारख्या वाईट माणसांनीं भरलेलं आहे. तेव्हां माझी समजूत पटायला पांढऱ्यावर कांहीं तरी काळं करावं.

**बाबा०** : इतकं आडवळणानं कशाला बोलतां ? दिलेला शब्द पाळण्यांत माझे काळ्याचे पांढरे झालेत—

**काळे** : म्हणूनच पांढऱ्यावर काळं करा बाबासाहेब ! हा कपाशीचा भाव तुमच्या मनासारखा तेजींत आला म्हणजे हत्ती झुलतील तुमच्या दारांत ! आहांत कुठं ? मला तर खात्री आहे, कीं तुम्ही या सट्ट्यांत लाखोपति होणार ! हा पहा दस्तऐवज मी लिहून आणलाय, तो वाचून पहा आणि करा सही त्यावर. व्यवहाराला सरळ असावं माणसानं. ( कागद देतो. ) पहा वाचून. ( बाबासाहेब वाचीत असतां ) मीं जें कांहीं लिहिलंय् तें आपलं व्यवहार म्हणून. त्याची प्रत्यक्ष अंमलबजावणी माझ्या हातानं होणार नाहीं. अहो, मीं कांहीं माणुसकी सोडलेली नाहीं अजून ! तुमच्यासारख्या नामवंत माणसाशीं व्यवहार करावयाचा म्हणजे—( वाचन संपतें ) काय ? वाचलंत ? ठीक ! आतां खालीं सही करा म्हणजे झालं. कांहीं मनाला लावून घेऊं नका. धाडस करायला हवं माणसानं !

**बाबा०** : ( सही करीत ) काळे, माझ्या मनाविरुद्ध होतंय् हें !

**काळे** : मला तरी कुठं पसंत आहे ? पण काय करणार ? माझ्या वडिलांनीं घालून दिलेला कित्ता मला गिरवलाच पाहिजे !

**बाबा०** : ( कागद देत ) घ्या हा दस्तऐवज. एवढा सट्ट्याचा बार उडूं द्या हो मनासारखा, म्हणजे मग पहा !

**काळे** : हें काय विचारतां ? अहो, होणारच तसं ! बाबासाहेब, मी तुमचा हितचिंतक आहें. तुमच्या घरांत जर बरंवाईट झालं तर तें आपल्याला बघवणार नाहीं, सहन होणार नाहीं. तुमच्यासारख्या भल्या माणसाचं नेहमीं चांगलंच होत राहिलं पाहिजे.

**बाबा०** : बरोबर आहे तुमचं म्हणणं. हिच्या दुखण्याला मी कंटाळलोंय्.

**काळे** : चालायचंच. अहो, घर आहे तिथं दुखणीं असायचींच. त्याबद्दल मी नाहीं म्हणत.

**बाबा०** : मग ?

**काळे** : तुमचा मुलगा सुरेन, पहिल्या वर्गांत वकील झाला. तुमच्या-प्रमाणं लौकरच तो नांवलौकिकास चढेल.

**बाबा०** : यांत काय संशय ! माझ्या शिस्तींत वागल्याबद्दल त्याला चांगलं फळ मिळालंच पाहिजे. शिस्त म्हणजे शिस्त आहे माझी.

**काळे** : काय लाखांत बोललांत ! पण पुढं होणारा प्रकार जरा बरा नाहीं.

**बाबा०** : (आश्चर्यानें) कसला प्रकार ? असं आडपडद्यानं बोलूं नका.

**काळे** : बरं तर ! तुमच्या चिरंजिवानं स्वतःच्या लग्नाचं निश्चित् केलंय्.

**बाबा०** : होय. मला माहीत आहे. पुढं ?

**काळे** : पुढं असं, कीं तुमची भावी सून सुंदर आहे, सुशिक्षित आहे, पण तिच्या कुल-शीलाची कांहीं चौकशी केलीत का ?

**बाबा०** : माझ्या धंद्याच्या गडबडींत ही चौकशी करायला फावलंच नाहीं मला. काय हो काळे, तिच्याबद्दल कांहीं संशय आहे का ?

**काळे** : जमणाऱ्या लग्नांत मोडतां घालूं नये म्हणतात. पण मनाला राहवत नाहीं म्हणून बोलण्याचा दुर्धर प्रसंग ओढवलाय् माझ्यावर. बाबा-साहेब, ही रेखा कुठं राहात होती, आहे माहीत ? अनाथाप्रमाणं वाढवलेली आहे, मुंबईच्या श्रीमंतानं पोसलेली आहे आणि पत्नी म्हणून तुमच्या मुलानं तिचा स्वीकार करायचा ठरवलं आहे. तशी ती चांगली आहे. पण—

**बाबा०** : सुरेननं मला यांतलं कांहींच सांगितलेलं नाहीं.

**काळे** : तिच्याबद्दल लोक काय म्हणतात हें तरी माहीत आहे का ?

**बाबा०** : नाहीं.

**काळे** : नाहीं ? आश्चर्य आहे ! (इकडे तिकडे पहात) काय हो, आजूबाजूला कुणी नाहीं ना ? कसं सांगाव तुम्हांला हें ? आपली तर जीभ रेटत नाहीं.

**बाबा०** : (इकडे तिकडे पाहून) कुणीहि नाहीं. काळे, अगदीं संकोच न बाळगतां सांगा तुम्ही.

**काळे** : तर मग इकडे या. [ कोपऱ्यांत जाऊन कानांत सांगतात. ]

**बाबा०** : ( संतापून ) तें शक्य नाहीं. ही गोष्ट खरी असेल तर मी सुरेनला मुळींच परवानगी देणार नाहीं.

**काळे** : तें तुमचं तुम्ही पहा. पण असे संतापूं नका. मित्रकर्तव्य या नात्यानं मीं तुम्हांला सांगितलंय् हो ! मागनं उगीच मनाला रुखरुख नको लागायला ! बराय्, येतों मी. राग मानूं नका हं माझ्या स्पष्टपणाचा ! आणि सुरेनवरहि रागावूं नका. अजून लहान आहे तो ! व्हायच्याच अशा चुका ! बराय्, येतों मी. जय सुधारणा ! [ जातो. ]

**बाबा०** : ( अस्वस्थ मनानें येरझाऱ्या घालीत, स्वतःशीं ) सुरेन तरुण आहे. त्याच्यावर एकदम संतापून उपयोगी नाहीं. माझी एवढी कडक शिस्त असतांना हा वाहवला कसा ? लग्नासारख्या महत्त्वाच्या बाबतींत त्यानं मला एका शब्दानं कसं विचारलं नाहीं ? माझी शिस्त मोडण्याइतकी या पोरीनं भुरळ घातलीन् त्याला. एकदम मी त्याच्यावर संतापलों आणि– छे ! कांहीं सुचत नाहीं. ( विमनस्कतेनें खोलींत जातात. )

**सुरेन** : ( प्रवेशून, कपडे काढून टाय सोडीत ) इतक्या विनवण्या केल्या मीं, तेव्हां कुठं डॉक्टरनं आईची प्रकृति तपासण्याचं कबूल केलंन्. त्यांतहि त्यानं आपली लहर सोडली नाहीं. म्हणतो कसा, मला वाटेल त्या वेळीं मी येईन. अजब माणूस आहे झालं !

**बाबा०** : ( प्रवेशून दबलेल्या संतापानें ) कुठं गेला होतास सुरेन ?

**सुरेन** : विचारे वकिलांच्याकडे. सनद काढायची आहे ना ?

**बाबा०** : स्वतःच्या पायावर उभा राहण्याइतका तूं मोठा झालास. संतोष वाटला मला.

**सुरेन** : दुसरी एक बातमी सांगायची म्हणजे डॉक्टर कैलास आईला तपासणार आहे.

**बाबा०** : माझ्यापेक्षां आतां तुलाच तिची जास्त काळजी. माझ्या उद्योग-धंद्यामुळं एखादे वेळीं तिची हेळसांड होते. पण मी तरी काय करणार ? पैशाशिवाय पाऊल उचलत नाहीं जगांत. आतां तूं वकील झालास——

**सुरेन** : तुमच्या आशीर्वादानं चांगला लौकिकहि मिळवीन.

**बाबा०** : सुरेन, तुला कांहीं गोष्टी सांगायच्या आहेत आणि कांहीं गोष्टी विचारायच्या आहेत. तुझ्या आईशीं मी पुनर्विवाह केला आणि समाजांत सुधारणा घडवून आणली. त्या काळांत आपल्या समाजांत असली सुधारणा मानवत नव्हती; म्हणून लोकांनीं आम्हांला वाळींत टाकलं. त्यामुळं आम्हां दोघांना अत्यंत हालांत दिवस काढावे लागले. एका तरुण विधवेनं पुनर्विवाह करून पुन्हां कुंकू लावलं हा प्रकार पाहून धर्मनिष्ठ लोकांच्या अंगाची लाही झाली. धर्म भ्रष्ट झाला म्हणून सारा गांव आमच्यावर खवळून उठला. गांवांत हळदीकुंकवाचा समारंभ झाला तर तुझ्या आईला कुणीहि स्त्री बोलवीत नव्हती. एकदां विधवा झालेली स्त्री पुन्हां सवाष्ण होणं शक्यच नाहीं असं सर्वांना वाटत होतं. सुरेन, तुझी आई भरल्या मळवटानं घरीं येण्याऐवजीं भरल्या डोळ्यांनीं येत असे. परंतु आम्ही धीर सोडला नाहीं. स्वतःचं गांव सोडून आम्ही इथं आलों. तुला आणि कालिंदीला आम्ही पंचप्राणांच्या पांघरुणांत घालून जपणूक केली. कां ? तुम्हांला दुःखाचा वारा लागूं नये म्हणून. आतां तुझं लग्नाचं वय झालेलं आहे, आणि तूं आपल्या भावी पत्नीची निवडहि केली आहेस. पण—

**सुरेन** : थांबलांत कां ? चुकली का माझी निवड ? रेखा पसंत नाहीं का तुम्हांला ?

**बाबा०** : माझ्या पसंतीचा प्रश्न नाहीं. तशी ती चांगली आहे पण—

**सुरेन** : माझं कांहीं चुकत असेल तर तसं सांगा.

**बाबा०** : रेखाची निवड करतांना ज्या गोष्टीचा नीट विचार करायला पाहिजे होता तो तूं केला आहेस का ?

**सुरेन** : असं कां म्हणतां ? ती शिकलेली आहे, चांगली आहे, तशीच मनमिळावू स्वभावाची आहे.

**बाबा०** : येथपर्यंत सर्व गोष्टी बरोबर आहेत. पति या दृष्टीनं तूं तिच्याकडे पाहिलंस. परंतु मी तिचा सासरा होणार आहें. सुनेविषयीं सासऱ्याच्या मनांत कोणत्या अपेक्षा असतात तें तुला नीट समजलेलं नाहीं. सुरेन, सासरा आपल्या सुनेच्या चांगल्या कुळाची आणि शीलाची अपेक्षा बाळगतो.

**सुरेन** : बाबा, रेखा अनाथाश्रमांत होती म्हणून तिच्या शीलाबद्दल तुम्हांला संशय येतो का ?

**बाबा०** : ती स्वतः शीलवती असेल, पण तिच्या कुळाविषयीं तुला कांहीं माहिती आहे का ? कां ? बोलत कां नाहींस ? याचा अर्थ असा कीं तुला तिच्या आईबापांबद्दल कांहींसुद्धां ठाऊक नाहीं.

**सुरेन** : बाबा, मर्यादा सोडून बोलतोंय् याची क्षमा करा. शीलवान् मुलीचं कूळ संशयित असलं तर तिला वाईट ठरवायची का ? तिला समाजांतून उठवायची का ?

**बाबा०** : हा प्रश्न म्हणजे एक कोडं आहे. पण सुरेन, सध्यां मी तुझ्या-पुरतं बोलतोंय्. इतर गोष्टींचा विचार करण्याची मला आवश्यकता नाहीं.

**सुरेन** : माझे वडील प्रसिद्ध समाजसुधारक आहेत याचा मला अभिमान वाटतो. इतकी आकुंचित मनोवृत्ति चांगली दिसेल का ? बाबा, तुम्ही समाजांत सुधारणा करतांना सगळीं बंधनं तोडलींत. तेव्हां तुमच्या मुलानं रेखासारख्या मुलीशीं लग्न करून सुधारणेचं एक पाऊल पुढं नको का टाकायला ?

**बाबा०** : शाबास सुरेन ! माझा मुलगा शोभतोस खरा ! परंतु आम्हांला जो त्रास भोगावा लागला तसला वनवास तुमच्या कपाळीं येऊं नये असं मला वाटतं. तसंच या लग्नामुळं आपलं घराणं खालीं येईल—काळिमा लागेल.

**सुरेन** : पण मला तसं वाटत नाहीं. तिच्या सद्‌गुणांकडे पाहिल्यावर तिच्या आईबापांचा विचार करण्याचं कारणच उरत नाहीं. निवडुंगाच्या फडांत पडलेलीं सुवासिक फुलं वेंचतांना हाताला कांटे बोचले तर त्याची पर्वा कां बाळगायची ?

**बाबा०** : हा विचार ऐकायला चांगला असला तरी परिणामीं घातक आहे.

**सुरेन** : म्हणजे ? तुम्हांला माहीत आहे तिच्या जन्माचा इतिहास ?

**बाबा०** : रेखा अनाथाश्रमांत कां गेली ठाऊक आहे तुला ? एक बेवारशी पोर म्हणून तिला त्या आश्रमांत नेऊन ठेवलं.

**सुरेन** : पण ती कुणाची मुलगी तें ठाऊक आहे का ?

**बाबा०** : तिचे आईबाप समजून घ्यायला फार अधीर झाला आहेस तूं ! तेव्हां आतां स्पष्टच सांगतों तुला. सुरेन, [ फ्लॉवरपॉट घेऊन रेखा क

कालिंदी दारांत येऊन थबकतात. ] ही रेखा एका नायकिणीनं टाकून दिलेली मुलगी आहे. सुरेन, रेखा ही वेश्येची मुलगी आहे. [ रेखाच्या हातून फ्लॉवरपॉट पडून फुटतें. तिच्या तोंडून अस्फुट किंकाळी बाहेर पडते. ]

**रेखा** : ( दुःखावेगानें ) सुरेन, माझ्या आशेचे तुकडे तुकडे झाले.

**सुरेन** : रेखा–रेखा–[ भावनातिशयानें रेखाकडे जातो. तिला भोंवळ येऊं लागते. कालिंदी तिला सांवरते. ] रेखा, असं काय करतेस ?

[ तोंच घाबऱ्या झालेल्या शांताबाई खोकत तोल सांवरीत प्रवेश करतात. ]

**शांता०** : ( गुदमरलेल्या आवाजांत ) सुरेन–सुरेन–( कोचावर अंग टाकतात. )

**सुरेन** : ( शांताबाईजवळ येऊन ) आई, आई ! असं काय करतेस ?

**शांता०** : ( उरांतील कळ दाबून ) सुरेन–( कोचावर बेशुद्ध पडतात. )

**बाबा०** : ( अस्वस्थतेनें ) असं काय झालं एकदम ? ( वारा घालतात. )

[ डॉक्टर कैलास बॅग घेऊन प्रवेश करतो. त्याच्या नजरेंत सूड दिसतो. ]

**कैलास** : ( रेखाला ) तूं इथं कशाला तडफडायला आलीस ?

**रेखा** : ( हुंदके देत ) डॉक्टर, मी म्हणजे—

**कैलास** : समजलं तुला काय म्हणायचंय् तें ! रडायचं असेल तर घरीं जा ! जा ! एक क्षणभर इथं थांबूं नकोस. जा ! ( रेखा निघते. मागोमाग कालिंदी निघते. ) कालिंदी, तूं कशाला तिच्याबरोबर जातेस ? बेवारशी आहे ती ! जाऊं दे तिला एकटीलाच. ( रेखा जाते. )

[ बॅग टीपॉय्वर ठेवून कैलास सर्वांकडे जहरी नजरेनें पहातो. त्याची दृष्टि शांताबाईंवर स्थिर होते. विस्फारित डोळ्यांनीं तो शांताबाईंकडे पहातो. ]

**बाबा०** : डॉक्टर, वेळेवर आलांत. अशी कां ही घाबरली ?

[ कैलास चमत्कारिक नजरेनें शांताबाईंकडे पहात त्यांची नाडी पहातो. भिण्याचें कारण नाहीं असा भाव त्याच्या मुद्रेवर दिसतो. तो शांतपणें बाजूला उभा राहून सिगारेट पेटवतो. ]

**सुरेन** : काय होतंय् रे तिला ?

**कैलास :** ( सिगारेटचा झुरका घेत, करड्या सुरांत ) मी जिथं असतों त्याच्या आसपास काळपुरुष आपलीं पावलं वाजवीत फिरत असतो.

**सुरेन :** ( घाबरून ) म्हणजे डॉक्टर, आईचं यांतच कांहीं–

**कैलास :** बरं वाईट होणार असं का वाटतं तुला ? माझ्या बोलण्याचा अर्थ तुला समजला नाहीं. आसपास फिरणारा तो काळपुरुष माझ्या हातांतलं माणूस नेऊं शकत नाहीं.

**सुरेन :** ( अधीरतेनें ) आतां वेळ घालवूं नकोस. मी काढूं का स्टेथॅस्कोप ? ( बॅग उघडूं लागतो. )

**कैलास :** ( झटकन् त्याचा हात पकडून ) खबरदार बॅगला हात लावलास तर ! त्यांत अमृत आणि विष हीं गळ्यांत गळा घालून लोळत पडलीं आहेत.

**सुरेन :** ( भीतीनें ) काय ? विष ?

**कैलास :** कां ? घाबरलास ? विष प्याल्यानं मरतो मनुष्य ! पण मी त्याच विषानं मरणाराला जगवतों !

**बाबा० :** हिला तपासतां ना डॉक्टर ?

**कैलास :** फार घाई झालेली दिसतेय् तुम्हांला. तुम्ही सुधारक, समाजाच्या रोगाचं निदान जितक्या शांतपणानं आणि विचारानं करतां, तितक्याच शांतपणानं मी यांच्या रोगाचं निदान करणार आहें.

**सुरेन :** तुला पाहिजे तें कर, पण हिचा त्रास कमी होईल असं कर म्हणजे झालं.

**कैलास :** ( गंभीरपणें ) सुरेन, तुला आई पाहिजे ? कालिंदी, तुलाहि ? सर्वांना आई पाहिजे. पण मला–

**शांता०** ( कण्हत ) सुरेन—पाणी—

**बाबा० :** जा, पाणी घेऊन ये. ( सुरेन जातो. ) कसं वाटतं आतां ? असं काय झालं एकाएकीं ?

**कैलास :** ( संताप दाबून ) बाबासाहेब, आतां मी इथं आहें. माझे प्रश्न तुम्ही विचारूं नका.

**सुरेन :** ( पाणी आणून ) आई, हें घे पाणी. ( पाणी देतो. )

**शांता०** : ( पाण्याचा घोट घेऊन क्षणभरानें ) डॉक्टर, तुम्ही केव्हां आलांत ?

**कैलास** : तुम्ही डोळे मिटल्यावर.

**शांता०** : कालिंदी, बैस माझ्याजवळ. सुरेन, तूंहि बैस. ( दोघें बसतात.) फारच चमत्कारिक झालं मला. विणायच्या सुया उरांत खुपसल्यासारखं वाटलं. घशांत घुसमटल्यासारखं होऊन दुसऱ्या क्षणाला जीव जाईल कीं काय असं झालं मला. एकदम जीव गोळा झाला.

**बाबा०** : मग स्वेटर कशाला घेतला विणायला ? बरं, आतां फार बोलूं नका.

**सुरेन** : डॉक्टर—

**कैलास** : समजलों मी. बाबासाहेब, प्रथम मला यांच्या रोगाचं निदान केलं पाहिजे. यांचा रोग मानसिक आहे. परिस्थिति अशी आहे कीं, मी यांना तपासतांना इथं कुणीहि असतां कामा नये. तुम्ही सर्वजण इथन गेलांत तर बरं होईल.

**बाबा०** : ठीक आहे. तुमच्या म्हणण्याप्रमाणं होऊं द्या. चला. सुरेन, कालिंदी, चला. [ बाबासाहेब आणि सुरेन जातात. कालिंदी जाऊं लागते. ]

**शांता०** : कालिंदी, तूं बैस माझ्याजवळ.

**कैलास** : कशाला ? एका मुलीला नुकतीच घराबाहेर घालवलीत; दुसरीला कशाला जवळ बसवतां ? कालिंदी, जा तूं. [ कालिंदी जाते. ]

[ त्रस्त-मनानें कैलास एक दोन फेऱ्या घालतो. त्याच्या डोक्यांत विचारांचें वादळ चाललेलें असतें. या प्रसंगास अनुसरून पार्श्वसंगीत. ]

**शांता०** : तुमच्या बोलण्याचा अर्थ समजला नाहीं मला ! कोणत्या मुलीला घराबाहेर घालविली ?

**कैलास** : माझ्या बोलण्याचा अर्थ तुम्हांला या वेळीं समजला नाहीं तरी चालेल. सुरेनच्या सांगण्यावरून मी तुम्हांला तपासायला आलोंय्. तुमच्या रोगाचं स्वरूप मला समजावून घेतलं पाहिजे. बरं, काय हो, फार वर्षे तुम्ही आजारी आहांत म्हणून सुरेननं मला सांगितलं. किती वर्षे झालीं तुम्ही आजारी आहांत ?

**शांता०** : गेलीं पांच-सहा वर्षं मला त्रास होतोय्. अगदीं जीव नकोसा झालाय्.

**कैलास** : साहजिकच आहे. चार दिवसांच्या आजाराला माणूस कंटाळतो! तुम्हीं तर इतकीं वर्षं आजारांत काढलींत! काय होतंय् तुम्हांला?

**शांता०** : तेंच तर समजत नाहीं. एकसारखा अशक्तपणा वाटतो. उभी राहिलें तर एकदम पडेन कीं काय अशी भीति वाटते. रात्रीं झोंप नीट लागत नाहीं. बघणाराला वाटेल कीं मला कांहीं होत नाहीं म्हणून.

**कैलास** : बरं. (क्षणभरानें) स्वेटर विणायला घेतलांत वाटतं?

**शांता०** : हो. बसल्या बसल्या कांहीं उद्योग नको का करायला?

**कैलास** : हं! (क्षणभरानें) तुम्हीं बाबासाहेबांशीं दुसरं लग्न केलंत. एक अलौकिक सुधारणा तुम्ही समाजांत घडवून आणलीत, म्हणून लोकांनीं तुमचा गौरव केला.

**शांता०** : छे हो! गौरव कसला आलाय्? फार हालअपेष्टा भोगल्या आम्ही.

**कैलास** : तरी पण आपण कांहीं तरी चांगली गोष्ट केली याचं तुम्हांला समाधान मिळालंच. शिवाय ज्यांना ती सुधारणा पसंत होती त्यांनीं तुम्हांला धन्यवाद दिले.

**शांता०** : कसलं समाधान आणि कसले धन्यवाद घेऊन बसलांत डॉक्टर! वर्तमानपत्रांनीं आमचं पोकळ अभिनंदन केलं, आणि सगळ्या गांवकऱ्यांनीं आमच्या संसाराचा खेळखंडोबा केला! पावलोपावलीं टिपं गाळावीं लागलीं आम्हांला!

**कैलास** : चालायचंच. नवीन सुधारणा होतांना असा त्रास सहन करावा लागतो माणसाला. बरं. म्हणजे कांहीं लोकांनीं तुमच्यावर अभिनंदनाचीं फुलं उधळलीं तर कांहीं लोकांनीं निंदेचे दगड मारले तुम्हांला. शांताबाई, या दगडाफुलांतून एक साप सळसळ करीत तुमच्या मागोमाग येत होता, तो दिसला का तुम्हांला?

**शांता०** : कसला साप म्हणतां तुम्ही डॉक्टर?

**कैलास** : मागं वळून पाहिलंच नाहीं तुम्हीं, तर मग कसा दिसणार तो तुम्हांला? काय हो, बाबासाहेबांनीं सुधारक म्हणून मान मिळविला,

त्याच्या तुम्ही भागीदार आहांत. मान मिळाला, पैसा मिळाला, कालिंदी आणि सुरेनसारखीं मुलं मिळालीं; सगळीं सुखं हात जोडून उभीं आहेत; मग तुम्ही आजारी कां ?

**शांता०** : (उसासून) कां ! हें माझं कमनशीब ! दुसरं काय म्हणणार मी ?

**कैलास** : कमनशीब कसं म्हणतां येईल ? आतांपर्यंत तुम्हीं आपलं आयुष्य स्वतः घडविलेलं आहे. तुमचे पहिले यजमान वारले. उभा जन्म तुम्हांला वैधव्याच्या चिखलांत खितपत काढावा लागला असता—पण तुम्ही सर्व बंधनं तडातड् तोडून पुनर्विवाह करून सुखाकडे धांव घेतलीत. त्या सुखाचा आणि वैभवाचा उपभोग घेतांना धुंदी चढली तुम्हांला.

**शांता०** : काय बोलतां हें तुम्ही डॉक्टर ? मुळींच तसं झालं नाहीं. कांहीं तरी गैरसमज झालेला दिसतो तुमचा.

**कैलास** : तुम्ही आपल्याच सुखांत गुंग झालांत, आणि कांहीं गोष्टींचा विसर पडला तुम्हांला.

**शांता०** : कसल्या गोष्टींबद्दल म्हणतां तुम्ही ?

**कैलास** : तुमच्या रोगाचं मला निदान करायचंय्. तेव्हां माझ्या प्रश्नाला खरीं उत्तरं द्या. कारण डॉक्टरपासून रोग्यानं कांहीं लपवून ठेवूं नये. अगदीं सरळ उत्तर दिलंत तर माझं काम सोपं होईल.

**शांता०** : ठीक आहे. काय पाहिजे तें विचारा. तुमच्या म्हणण्याप्रमाणं देईन उत्तरं.

**कैलास** : ( करड्या सुरांत ) शांताबाई, तुमचा आजार म्हणजे तुम्ही कसला तरी विचार करीत असतां. तो विचार म्हणजे तुमच्या मनाला कसली तरी रुखरुख लागलेली आहे.

**शांता०** : छे बाई ! माझ्या मनाला कसली रुखरुख लागणार ?

**कैलास** : आतां जरा स्पष्टच विचारतों. तुमची ही सुधारणा, हा मोठेपणा एखाद्या दुष्टाव्याच्या पायावर उभा केलेला आहे काय ?

**शांता०** : नाहीं हो डॉक्टर ! मीं कधींहि कुणाचा दुष्टावा केलेला नाहीं. मला काय कमी आहे ?

**कैलास** : ( उपरोधानें ) मला काय कमी आहे ! अहंकारानं खोटं

बोलणं फार सोपं असतं. पुन्हां मी विचारतों, तुमची सुधारणा कुणाच्या तरी रक्तानं बरबटलेली आहे.

**शांता०** : काय म्हणालांत? रक्तानं–रक्तानं! मुळींच नाहीं. मीं कधींहि कुणाचाहि घात केलेला नाहीं.

**कैलास** : नाहीं? पुन्हां नीट विचार करून उत्तर द्या. भूतकाळाचा पडदा बाजूला सारून स्वतःच्या आयुष्याकडे पुन्हां एकदां डोळे फाडून पहा–नीट कान उघडून ऐका. काय दिसतंय् तुम्हांला? काय ऐकूं येतंय्? (शांताबाई संभ्रमांत पडतात) पहा, रक्ताच्या थारोळ्यांत तडफडतांना कोण दिसतंय् तुम्हांला? कुणाच्या किंकाळ्यांनीं तुमच्या अंतःकरणाचे पडदे फाटून निघताहेत? आई आहांत तुम्ही!...एक कोंवळा जीव, हातापायांचे आंकडे वळीत उलथापालथा होऊन घसा फुटेपर्यंत ओरडतोय्... किंचाळतोय्! त्यानं फोडलेल्या टाहोनं तुमची छाती फुटून निघत आहे...त्या बाळाला उचलतांना तुमच्या शरीरांतल्या साऱ्या नाड्या आक्रसून गेल्या आहेत...त्याच्याकडे शेवटची नजर टाकतांना तुमच्या डोळ्यांचीं बुबुळं बैदुलाप्रमाणं बाहेर आलेलीं आहेत...तुमची जीभ आंत ओढली जाऊन घसा कोरडा ठणठणीत पडलाय्! शांताबाई, दिसला तो कोंवळा जीव तुम्हांला?

**शांता०** : (कोरड्या ओठांवरून जीभ फिरवीत, अत्यंत भीतीनें) डॉक्टर–डॉक्टर–असलं भयानक चित्र माझ्या डोळ्यांसमोर उभं करूं नका. कोंवळा जीव...अजाण बाळ–

**कैलास** : सुधारणेच्या टाचेखालीं तुम्ही तें बाळ चिरडून टाकलंत कीं नाहीं? त्याच्या रक्ताचे डाग मला अजून तुमच्या पायांवर दिसताहेत! तो पहा त्याचा चिमुकला हात...त्या हातावरची आयुष्यरेषा तुम्हीं फाडलीत. त्यानं आपल्या चिमुकल्या मुठींत धरलेला तुमचा पदर सोडवून घेतांना तुमच्या हाताचीं बोटं थरथर कांपताहेत. तुमच्या अंगाचा कसा थरकांप उडालाय् पहा! तें पहा-तें पहा-त्याला यमाच्या कराल दाढेंत देतांना तुम्हीं आपले डोळे झटकन् मिटून घेतलेत...

**शांता०** : ( थरथर कांपत आवेगानें ) डॉक्टर, पायां पडतें मी तुमच्या ! नाहीं ऐकवत हें ! नाहीं हो सहन होत ! डॉक्टर, नाहीं हो !

**कैलास** : हेंच दुष्ट कृत्य तुम्हीं केलंत. स्वतःच्या सुखासाठीं एका बाळाचा बळी घेतलांत ! कशी सुखानं झोंप येईल तुम्हांला ? त्या बाळाचं पिशाच्च रात्रीं तुमच्या डोळ्यांसमोर उभं राहतं ! त्या पिशाच्चाचीं तीक्ष्ण नखं तुमच्या मानेंत खुपसलीं जातात. त्यामुळं तुमचा जीव आंतल्या आंत तडफडतो. पण अंधारांत केलेल्या दुष्ट कृत्यामुळं अंधारांतहि तुम्हांला ओरडतां येत नाहीं. शांताबाई—तो बाळ तुमचा कर्दनकाळ झालाय्. पापाचा प्रचंड पर्वत तुमच्या पाठीशीं उभा आहे. तो बाळ त्यावर अकांड-तांडव करतोय्. क्षणांत त्या पर्वताखालीं तुम्ही दडपून जाणार आहांत. गुदमरून जीव घोटाळून प्राण जाणार आहे तुमचा—अजून सांगा.

**शांता०** : ( आत्यंतिक तळमळीनें ) नाहीं—नाहीं डॉक्टर, माझ्या हातानं असलं अघोर कृत्य झालेलं नाहीं.

**डॉक्टर कैलास** : ( त्वेषानें बॅग उघडीत ) नाहीं झालं ?

**शांता०** : नाहीं—नाहीं—

**डॉक्टर कैलास** : अजून खरं सांगा—

**शांता०** : ( अत्यंत काकुळतीनें ) डॉक्टर—नाहीं हो—

**कैलास** : तर मग ( बॅगमधून लहान मुलाचा स्वेटर काढून ) हा पहा स्वेटर—नीट पहा—( शांताबाईसमोर धरून ) पहा, तुम्हींच विणलेला आहे हा ! याच स्वेटरमध्यें तुमच्या रक्तामांसाचा गोळा तडफडत होता. या स्वेटरचा प्रत्येक धागा तुमचं अघोर कर्म अजून ओरडून सांगतोय्. याची प्रत्येक वीणन् वीण त्या बाळाचा गळफांस झालेली होती. पहा—हातांत घेऊन पहा. याच्या आगीनं हात होरपळतील तुमचे ! पहा—( स्वेटर शांताबाईच्या हातांत देतो. )

**शांता०** : ( स्वेटर निरखून पाहतांना भिऊन ) हा स्वेटर—

**कैलास** : हो, हाच तो स्वेटर !

**शांता०** : हा स्वेटर—हा स्वेटर ( ओळख पटून ) माझ्या—माझ्या—

[ किंकाळी फोडून बेशुद्ध पडतात. ]

[ तत्काळ बाबासाहेब, सुरेन आणि कालिंदी धांवत येतात. तोंपर्यंत कैलास शांताबाईच्या हातांतला स्वेटर त्वरेनें घेऊन बॅगमध्यें ठेवतो. ]

**बाबा०** : डॉक्टर, काय केलंत हें ?

**कैलास** : ( शांतपणें ) रोगाचं निदान !

**सुरेन** : डॉक्टर, माझी आई–

**कैलास** : ( उपहासानें ) मेली नाहीं, बेशुद्ध पडलीय् !

**बाबा०** : ( संतापून ) डॉक्टर, आहांत कोण तुम्ही ? माणूस कीं सैतान ?

**कैलास** : ( विकटपणानें हंसून ) दोन्हीहि ! [ निघून जातो. ]

**पडदा पडतो.**

# अंक तिसरा

[ **स्थळ** : पहिल्या दोन अंकांप्रमाणेंच. कालिंदी गाणें म्हणत आहे. ]

## पद ६ वें

**अंतरीं माझ्या लावुनी ज्योती ।**
**जीवन उजळील का ॥ धृ० ॥**
**अंतरीं माझ्या भावकळ्या या ।**
**कुणि तरी फुलविल का ॥ १ ॥**
**सांगु कुणाला हृदयव्यथा ही ।**
**समजाविल कुणि का ॥ २॥**

[ पद संपल्यावर सुरेन प्रवेश करतो. त्याची मुद्रा उदास दिसते. ]

**कालिंदी** : भैय्या–( सुरेनचें लक्ष नसतें. जवळ जाऊन ) भैय्या, काय विचार ठरला तुझा ?

**सुरेन** : कांहीं सुचेनासं झालंय् मला. इकडं आईची मनःस्थिति अशी चमत्कारिक झालीय्. तिकडं रेखाला रडतां भुई थोडी झालीय्. आणि बाबा तर तेजी-मंदींत गुंग झालेत. गेले आठ दिवस घरांत सगळीकडं अवकळेचा हात फिरल्यासारखा दिसतोय्.

**कालिंदी** : मी आज सकाळीं रेखाकडं गेलें होतें. डॉक्टर तिच्याबरोबर नीट बोलत नाहींत. भैय्या, तिची स्थिति अगदीं केविलवाणी झालीय् रे ! मीं तिला प्रथम ओळखलंच नाहीं, इतका फरक पडलाय् तिच्यांत ! ती बोलतांना म्हणाली कीं, आज तूं बाबांना विचारून निश्चित ठरवलं नाहींस तर ती जिवाचं बरंवाईट करून घेतल्याशिवाय राहणार नाहीं. आणि भैय्या, हें सांगतांना तिची चर्या इतकी विचित्र दिसली, कीं कदाचित् ती तुझी वाटहि पहाणार नाहीं.

**सुरेन** : काय बोलतेस तूं हें ? इतका तिच्या मनावर परिणाम झालाय् ? मीं दोन-तीन वेळां डॉक्टरला भेटण्याचा प्रयत्न केला पण त्यानं मला मुद्दाम टाळलं. कालिंदी, त्यानं जी गुंतागुंत करून ठेवलीय् ती कशी सुटणार हेंच

समजत नाहीं. ( विचार करून ) ठरलं ! कालिंदी, काय वाटेल तें झालं तरी मी आज बाबांना विचारून नक्की करणार.

**कालिंदी** : पण भैय्या, सकाळपासून बाबा फारच अस्वस्थ दिसताहेत. मी एक दोन वेळां आईबद्दल बोलायला गेलें तर तें वस्कन् माझ्या अंगावर आले. आजपर्यंत ते इतके कधीं माझ्यावर ओरडले नाहींत. भैय्या, पुढं कोणतीं संकटं येणार आहेत तें कांहीं कळत नाहीं.

**सुरेन** : सत्य हें कादंबरीपेक्षां चमत्कारिक असतं असं म्हणतात, त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतोंय् मी ! पाऊल न वाजवतां संकट घरांत शिरतं आणि गळ्याभंवतीं त्याचा फांस आवळला गेला म्हणजे मगच त्याची कल्पना येते. कालिंदी, कसलीहि आपत्ति कोसळून पडणार असली तरी मला रेखाचं रक्षण केलंच पाहिजे.

**कालिंदी** : नीट विचार कर. नाहीं तर बाबा संतापले म्हणजे काय होईल त्याचा नेम नाहीं.

**सुरेन** : विचार ! आतांपर्यंत विचारानं वागलों तो बाबांच्या दृष्टीनं अविचार ठरला. आतां यापुढं अविचारानंच वागायचं ठरवलंय् मीं ! त्याचा कितीहि वाईट परिणाम होणार असला तरी तो भोगायला मी तयार आहें. रेखा ही नायकिणीनं टाकलेली मुलगी आहे असं बाबा म्हणाले. पण त्यांच्या कानांत हें विष ओतलं कुणीं ?

**कालिंदी** : मला मुळींच खरं वाटत नाहीं तें. तिचं वर्तन आणि विचारसरणी इतकी चांगली आहे, कीं तिच्या कुळाविषयीं नुसता संशय घेणंसुद्धां पाप ठरेल.

**सुरेन** : ( अर्धवट स्वतःशीं ) रेखा—वेश्येची मुलगी—बेवारशी—आईबाप माहीत नाहींत ! कालिंदी, तें कांहीं असलं तरी माझं ठरलं तें ठरलं. तिच्याशिवाय माझं जीवन उदास होईल.

**कालिंदी** : मग आतां वेळ गमावूं नकोस. नाहीं तर खरोखरच आत्महत्या करून घेईल ती. बाबा आले म्हणजे—[ पडद्यांत बाबासाहेबांचा चिडलेला आवाज, " हरबा, अरे हरबा ! " ] अग बाई, बाबा आले ! भैय्या, ते जरा रागावल्यासारखे दिसताहेत. एकदम त्यांच्यासमोर जाऊं नकोस. आंत चल. [ दोघें जातात. ]

[ संत्रस्त मुद्रेनें बाबासाहेब प्रवेश करतात. त्यांची चर्या ओढलेली असते. खुंटीवर उपरणें फेंकतात, कोपऱ्यांत काठी टाकतात, कांहीं तरी विचार केल्यासारखें करून कोट काढण्यासाठीं खोलींत जातात. पुन्हां बाहेर येतात. केंसांत बोटें फिरवीत अस्वस्थतेनें येरझाऱ्या घालतात. ]

**बाबा०** : घात झाला सगळा ! होतं नव्हतं तेवढं या सट्टयांत पणाला लावलं, आणि दुर्दैवानं जबरदस्त तडाखा मारला. धापा टाकीत पैशाचा पाठलाग केला, पण आतां छाती फुटून रक्त ओकण्याचा प्रसंग आला. संपत्तीचं स्वागत करायला गेलों आणि कमनशिबाला ठेंचकाळून दारिद्र्या-पुढं दंडवत घालण्याची पाळी आली. ( सभोंवार पाहून ) घर कसं फिरल्यासारखं झालंय्. तो काळे सैतानासारखा अकस्मात् वाटेंत भेटला. स्वतःची रक्कम वसूल करण्यासाठीं त्यानं माझ्यावर खटला केला तर ! छे छे ! अगदीं सरळ व्यवहारी माणूस आहे तो. पण न जाणो–छे ! डोकं कसं गरगरायला लागलंय् ! पैशापरी पैसा गेला. हिची प्रकृति जास्त बिघडलीय्, आणि सुरेन तर त्या वेश्येच्या कार्टीबरोबर लग्न करायचंय् म्हणतोय् ! यामुळं तर मी पार धुळीला मिळणार ! माझी कीर्ति, माझं वैभव माती-मोल होणार !

**सुरेन** : ( मंद पावलांनीं प्रवेश करतो. ) बाबा—

**बाबा०** : काय म्हणणं आहे तुझं ?

**सुरेन** : आमच्या लग्नाला तुमची परवानगी पाहिजे.

**बाबा०** : ( संताप दाबीत ) मागंच मीं तुला नीट समजावून सांगितलंय्. माझ्या दृष्टीनं तूं विचार केला आहेस का ?

**सुरेन** : पूर्ण विचार केलाय् मीं.

**बाबा०** : नाहीं. तसं असतं तर तूं मला हा प्रश्न पुन्हां विचारला नसतास. शिवाय, माझ्यावर कोणता बिकट प्रसंग ओढवला आहे याची तुला कल्पना नाहीं. या वेळीं तूं मला कांहींच विचारूं नकोस.

**सुरेन** : पण आजच याचा शेवट लागला नाहीं तर रेखाच्या आयुष्याचा शेवट होईल.

**बाबा०** : असल्या आततायीपणापेक्षां मला आपल्या घराण्याची प्रतिष्ठा जपली पाहिजे.

**सुरेन :** असली प्रतिष्ठा राखतांना रेखाचा बळी पडला तर ?

**बाबा० :** तुला अजून जगाचा अनुभव नाहीं. आजपर्यंत मीं तुला मोठं केलं, शिकविलं. हें करतांना तुला कसलंहि दुःख होऊं दिलं नाहीं, याची तुला जाणीव झाली का ?

**सुरेन :** ती जाणीव ठेवूनच मी आजपर्यंत वागलोंय्. परंतु कुळाच्या काल्पनिक कलंकासाठीं निष्कलंक रेखेचा मी सत्यानाश होऊं देणार नाहीं. तिच्या मनाची तुम्हांला कल्पना नाहीं.

**बाबा० :** तूं तरुण आहेस म्हणून असं बोलतो आहेस. रेखेचा विचार करण्याचं मला काय कारण ? स्वतःच्या घराण्याचा विचार चुकूनहि तिच्या मनांत आला नाहीं याला जबाबदार कोण ? हलक्या कुळांतील मुलगी तुझ्याशीं लग्न करून स्वतःचा मोठेपणा वाढवू पहात आहे ! सुरेन, तुला तिनं फसविलं. वेश्येच्या पोरीचं प्रेम म्हणजे अळवावरचं पाणी ! ती त्याच जातीची आहे हें खास. नाहीं तर तिनं तुझी इतकी दिशाभूल केलीच नसती.

**सुरेन :** तुम्ही कांहींहि म्हणालांत तरी माझा निश्चय कायम आहे.

**बाबा० :** ( चिडून ) अस्सं ! म्हणजे मी तुझ्या हिताचं सांगतोंय् तें तुला पटत नाहीं. आजपर्यंत तूं माझा शब्द मोडला नाहींस; आणि आजच कां ही दुर्बुद्धि आठवली तुला ? आतां तूं वकील झाला आहेस. तिच्यापेक्षां सुंदर आणि श्रीमंत मुलीशीं लग्न लावीन तुझं.

**सुरेन :** मला पैशाबरोबर लग्न करायचं नाहीं.

**बाबा० :** तुझा हेका सोडायला तूं तयार नसलास तर तुला माझी आज्ञा आहे कीं हें लग्न होतां कामा नये.

**सुरेन :** मला माझ्या निश्चयापासून परावृत्त करूं नका.

**बाबा० :** ( चमकून ) काय. म्हणालास ? तूंच बोललास का हें ? मीं तुला शिक्षण दिलं त्याचा हाच का परिणाम ?

**सुरेन :** तुमचं कर्तव्य तुम्हीं केलंत.

**बाबा० :** सुरेन, जास्त बोलूं लागलास ! आणखीन् जास्त बोललास तर खपायचं नाहीं मला तें ! माझ्या घरांत माझ्या मनाविरुद्ध एकहि गोष्ट होतां कामा नये. सुरेन, रेखाचं तोंडहि मला पहायचं नाहीं.

**सुरेन** : तिला मी आत्तांच इथं घेऊन येणार आहें.

**बाबा०** : ( ओरडून ) काय ? इथं घेऊन येणार तिला ? माझी इच्छा नसतांना ? सुरेन, फार वाहवलास तूं ! पण लक्षांत ठेव, रेखा इथं आली तर मी तिला फरफटत घराबाहेर काढीन–

[ कैलास रेखेला ओढीत आणतो. ]

**कैलास** : म्हणून मीं तुला इथं फराफरा ओढीत आणलं. रेखा, जीव द्यायला नदीवर कशाला गेलीस ? अग, बुडून मरतांना फार त्रास झाला असता तुला. कांहीं त्रास न होतां नकळत प्राण घेणारीं औषधं आहेत कीं माझ्या दवाखान्यांत ! त्यासाठीं नदीच कशाला पाहिजे ?

**रेखा** : मग खरंच मला मारून टाका. आतां मला मुळींच जगायचं नाहीं.

**सुरेन** : रेखा–रेखा– काय बोलतेस तूं हें ?

**बाबा०** : डॉक्टर, काय चालवलंय् तुम्हीं हें ?

**कैलास** : वाटायचंच तुम्हांला तसं. माणूस परिस्थितीच्या पेंचांत सांपडला म्हणजे त्याला सरळ गोष्टींतहि वाकडेपणा दिसूं लागतो. रेखाला आत्महत्या करायची आहे. तें काम तिला सोपं व्हावं म्हणून मीच तिला विषाचं इंजेक्शन देणार आहें. माणूस मरतांना कसं तडफडतं याचं सुदर चित्र दाखविणार आहें मी तुम्हांला. बॅग आणलीय् मीं बरोबर. बाबासाहेब, तुमची परवानगी आहे ना मला ? हो ! नाहीं तर मुलगा वकील झाला म्हणून त्याच्याकडून खुनाची पहिली फिर्याद ठोकाल माझ्यावर ! तुमची संमति असली म्हणजे मी कायद्याच्या कचाट्यांत फारसा सांपडणार नाहीं.

**बाबा०** : कसला दावा साधताहांत तुम्ही डॉक्टर ?

**कैलास** : हें माझ्या प्रश्नाचं उत्तर नव्हे. सुरेन, बोल. रेखाशीं लग्न करायला तयार आहेस ?

[ सुरेन हतबुद्ध होतो. कैलास जळजळीत नजरेनें त्याच्याकडे पहातो. ]

**रेखा** : डॉक्टर, त्यांच्यावर असा जुलूम करूं नका. मला लग्न करायचं नाहीं. मी नायकिणीची मुलगी आहें हें समजल्यापासून माझ्या आशा-

आकांक्षा करपून गेल्या. मला सुरेनच्या आयुष्याचा सत्यानाश करायचा नाहीं नको—मला लग्न नको—जगणं नको—( हुंदके देते. )

**कैलास** : सुरेन, असा कपाळाला हात लावून बसलास तर त्याचा कांहीं उपयोग नाहीं. या घटकेला कशाचा तरी शेवट लागलाच पाहिजे.

**बाबा०** : त्याला काय विचारतां तुम्ही ? मीच सांगतों. माझा मुलगा वेश्येनं टाकून दिलेल्या मुलीशीं मुळींच लग्न करणार नाहीं. मुलगा माझा आहे. त्यानं माझी आज्ञा पाळलीच पाहिजे. माझ्या घराण्याचा लौकिक राखलाच पाहिजे.

**कैलास** : सुरेन, तुझ्या वडिलांची आज्ञा तुला मान्य आहे ? काय करणार तूं ? एका बाजूला बाबासाहेबांची आज्ञा आणि घराण्याचा लौकिक आहे; दुसऱ्या बाजूला रेखा— वेश्येनं टाकलेली बदलौकिकाची मुलगी आहे.

**सुरेन** : डॉक्टर, अगदीं गोंधळून गेलोंय् मी ! काय करावं हें सुचत नाहीं. काय करूं मी ?

**बाबा०** : त्यांना काय विचारतोस ? मी अखेरचं सांगतों. सुरेन रेखा-बरोबर लग्न करणार नाहीं !

**कैलास** : बाबासाहेब, मीहि तुम्हांला अखेरचं सांगतों—सुरेन रेखाशींच लग्न करील !

**बाबा०** : तुम्ही त्याच्यावर हुकमत गाजविणारे कोण ? तुमचा त्याचा काय संबंध ?

**कैलास** : काय संबंध ? माझा हुकूम त्यानं पाळलाच पाहिजे.

**बाबा०** : मी त्याचा बाप आहें. माझ्या रक्तामांसाचा मुलगा माझ्या शब्दाबाहेर कसा जाईल ?

**कैलास** : तो तुमच्या रक्तामांसाचा मुलगा बोरघाटांत मेला. समजलं ? जन्मानं तुम्ही त्याचे वडील आहांत परंतु तो अपघातांत रक्तस्रावामुळं मरणोन्मुख झाला त्याच वेळीं तुमचा आणि त्याचा संबंध तुटला. सतत आठ दिवस मीं स्वतःच्या अंगांतलं रक्त त्याच्या अंगांत ओतलं, त्याला जिवंत केलं. तो त्याचा पुनर्जन्म झाला. जन्मानं तुम्ही त्याचे बाप आहांत तर त्याच्या पुनर्जन्मानं तोच अधिकार मला मिळाला आहे. पाहूं तो तुमचं कसं ऐकतो तें ! सुरेन, काय ठरलं तुझं ?

**सुरेन** : ( निश्चयी स्वरांत ) मी रेखाशीं लग्न करणार.

**बाबा०** : ( संतापून ) काय म्हणालास ? एका वेश्येच्या कार्टीला घरांत आणणार तूं ?

**कैलास** : रेखा वेश्येची मुलगी आहे असं कुणीं सांगितलं तुम्हांला ?

**बाबा०** : सगळे लोक म्हणतात ! बेवारशी पोरीशीं लग्न करायला माझा मुलगा बेवारशी नाहीं. [ कालिंदी प्रवेश करते. ]

**कैलास** : कशाला पुन्हां तेंच सांगतां ? सुरेन तयार असल्यावर तुमच्या बाष्कळ बडबडीला विचारतो कोण ?

**बाबा०** : घरांतनं हांकलून देईन या कार्ट्याला आणि तो मेला म्हणून आंघोळ करून मोकळा होईन !

**कैलास** : कसल्या भ्रमांत बोलतां हें ? तुम्ही समाजाचे पुढारी ! समाजाला वळण लावण्याचा तुमचा मोठा मान ! आणि तुमचा मुलगा बेवारशी मुलीशीं लग्न करायला निघाला तर लोकापवादावर विसंबून तुम्ही त्याला अडथळा करतां ! किती कोतं मन आहे तुमचं ?

**बाबा०** : तुम्ही तिची बाजू घेऊन बोलणारच ! कारण तुम्हीसुद्धां असेच एक बेवारशी आहांत ! तुम्हांला तरी तुमच्या आईबापांचा पत्ता आहे का ?

**कैलास** : ( गडबडून ) बाबासाहेब, बेतालपणानं पुढं बोलाल तर—तर—

**रेखा** : ( स्फुंदत ) डॉक्टर, बाबासाहेब, माझ्यासाठीं कशाला भांडतां ? आईबाप नाहीत मला ! मी वेश्येची मुलगी आहें असं लोक म्हणतात. तें कांहीं जरी असलं तरी मी हलक्या कुळांतली आहें या विचारानं माझं अंतःकरण पिंजून निघालंय्. डॉक्टर, हें दुःख नाहीं मला सहन होत. मी कां जन्मलें, कां मोठी झालें, कां शिकलें, आणि आतां माझ्या हृदयाच्या चिंध्या कां झाल्या ? डॉक्टर, देवाचा माझ्यावर असा कोप कां ? मीं काय पातक केलं म्हणून माझी अशी अवहेलना होत आहे ? बाबासाहेब, तुम्ही सुरेनवर राग धरूं नका. मीं त्यांच्यावर प्रेम केलं ही माझी चूक झाली. माझी कुळकथा मला समजली. आतां काय राहिलंय् माझं या जगांत ? बाबासाहेब, मला क्षमा करा. मी नाहीं दिसणार तुम्हांला पुन्हां. डॉक्टर, तुम्हीं माझ्या सुखासाठीं प्रयत्न केलांत, पण माझ्या नशिबीं कसलंहि सुख नाहीं. मी वेश्येची मुलगी...बेवारशी...

रस्त्यावर फेकून दिलेली ! डॉक्टर, कां तुम्हीं मला हें प्रथम सांगितलं नाहीं ? सुरेन, काय बोलूं मी आतां ? माझे सारे आधार तुटले—आज मी निराधार झालें—

**काळे** : ( प्रवेशून ) मी आहें कीं तुला आधार द्यायला तयार ! तूंच म्हणाली होतीस ना, कीं मी निराधार बायकांचा आधार म्हणून ?

**कैलास** : ( खवळून ) काळे !

**रेखा** : सुरेन, जातें मी. [ आवेगानें निघून जाते. ]

[ सुरेन तिच्या मागोमाग जातो. कालिंदी निघते. ]

**बाबा०** : कालिंदी, मागं फीर ! ( कालिंदी थांबते. )

**कैलास** : काळे, तुम्ही कशाला या घराला आग लावायला आलांत ?

**काळे** : असं ओरडून बोलूं नका बुवा ! थोड्या वेळानं या, असं बाबासाहेब म्हणाले. थोडा वेळ संपला म्हणून आलों. ( कालिंदीकडे हेतुपूर्ण नजरेनें पहात— ) ठीक आहे. बाबासाहेब—

**बाबा०** : ( काळ्यांची दृष्टि लक्षांत घेऊन ) कालिंदी, तूं घरांत जा.

**काळे** : असूं द्या त्यांना इथं. डोळे मिटून अंधार केला तरी सूर्याचा प्रकाश नाहींसा होत नाहीं. मी आलों होतों माझ्या कामासाठीं.

**बाबा०** : कालिंदी— [ कालिंदी आंत जाते. ]

**काळे** : ( कालिंदी गेली तिकडे पहात ) तरी हरकत नाहीं. बाबासाहेब, लागला निकाल तुमच्या नशिबाचा. धाडस केलं, पण जरा अंगाशीं आलं !

**बाबा०** : काय म्हणणं आहे तुमचं ? सट्टा केला त्यांत साफ बुडालों ! आतां दिवाळं निघून चौपदरी हातांत येणार ! पण ही गोष्ट कुणाला समजूं नये म्हणून मी शब्द बोललों नव्हतों कुणाजवळ. मीच तुमच्या घरीं येणार होतों. पण तुम्हीच इथं आलांत. काळे, त्या दस्तऐवजाप्रमाणं खरंच तुम्ही माझं घरदार धुऊन नेणार का ?

**काळे** : इतका निर्दय नाहीं मी ! पण माझी अट जर तुम्हीं कबूल केली तर निम्मे पैसे रोख पोहोंचल्याची पावती देईन तुम्हांला. राहिलेली रक्कम हप्त्याहप्त्यानं फेडा म्हणजे झालं.

**बाबा०** : वाटेल ती अट घाला. आहे मला कबूल. मी तर अगदीं कोसळून पडलोंय्.

**काळे** : बरं. ( घरांत पहात ) माझी अट—तुम्ही आपली कालिंदी मला द्यावी.

**बाबा०** : काय ? काय म्हणालांत ? माझी कालिंदी तुम्हांला देऊं ? त्यापेक्षां विहिरींत ढकलून देईन तिला मी !

**काळे** : छे ! छे ! असला अविचार चांगला नाहीं. माझ्या कर्जफेडीचा सोपा मार्ग मीं तुम्हांला सुचाविला, पण तुम्हांला तो पसंत नाहीं. तुम्हांला त्रास होऊं नये म्हणून मोठी आशा मनांत धरून मी आलों होतों. पण फार निराशा केली तुम्हीं माझी ! बाबासाहेब, घरांत हत्ती झुलणार होते तुमच्या ! पण आतां तांबडा पट्टा घातलेले बेलीफ आणि शिपाई गराडा घालतील या बंगल्याभोंवतीं. आतांपासूनच रस्त्यावर संसार थाटण्याची तयारी करा.

**बाबा०** : माझ्या काळजाचे असे लचके तोडूं नका हो !

**काळे** : तुमचं काळीज घेऊन काय करणार मी ? तुम्ही माझी रक्कम परत करूं शकणार नाहीं. तरी बरं, मीं तुमच्याकडून सगळं लिहून घेतलं. नाहीं तर माझ्या तोंडांतले राळे वाळले असते. अगदींच माणुसकी सुटूं नये म्हणून मीं तुम्हांला सवलतीचा मार्ग सुचविला. पण तुम्ही म्हणतां मुलीला विहिरींत ढकलून देईन म्हणून ! त्या विहिरीपेक्षां माझ्या घरांतच तिचं कल्याण होईल हें कसं तुम्हांला कळत नाहीं ?

**कैलास** : काळे, काय करायचं असेल तें कोर्टात जाऊन करा.

**काळे** : डॉक्टर, तुमच्याबरोबर बोलायचं म्हणजे सापानं मुंगसाशीं झटापट खेळण्यासारखं आहे. तुम्हांला आमचा व्यवहार माहीत नाहीं. तुम्ही रोगी तपाशीत दवाखान्यांत बसा, मी कागदपत्र तपाशींत कोर्टात बसतों.

**बाबा०** : तसं करूं नका हो काळे. माझी अब्रू चव्हाट्यावर मांडूं नका. हात जोडतों मी तुम्हांला.

**काळे** : ( उपहासानें ) अब्रू ! अब्रू सोडूनच माणूस सट्टा खेळतो. माझ्या अटीचा अजून विचार करा. पण फार वेळ दवडूं नका. मी थोडी सवड देतों.

**कैलास** : कशाला हा मनाचा मोठेपणा दाखवितां? जा कीं सरळ कोर्टांत!

**काळे** : काय लाखांत बोललांत! याला म्हणतात सरळ व्यवहार. डॉक्टर, तुमचा हा सल्ला पटला बुवा आपल्याला!

**बाबा०** : म्हणजे? खरंच तुम्ही माझा संसार बाहेर काढणार? काळे—

**काळे** : फार वाईट वाटतं हो मला! पण मी तरी काय करणार? व्यवहार म्हटला कीं माणुसकी जरा गुंडाळून ठेवावी लागते.

**बाबा०** : इतके तुम्ही निर्दय अंतःकरणाचे असाल अशी मला कल्पना नव्हती. दुष्ट! नीच!

**काळे** : असल्या शिव्या ऐकण्याची चांगली संवय आहे मला. माझ्या मनावर त्याचा कां ऽ ऽ हीं परिणाम होणार नाहीं. कारण माझा स्वार्थ मला चांगला समजतो.

**कैलास** : मग तुमच्या आजारी आईची विल्हेवाट लागली असेलच!

**काळे** : नाहीं अजून. तुम्हांला पोस्टमार्टेमसाठीं बोलावणं आलं म्हणजे समजेल. आतांच काय त्याचं?

**बाबा०** : काळे, अजून जरा नीट विचार करा. माझ्या बायकोची बुद्धि जरा भ्रमल्यासारखी झालीय्. घरांत दोन लहान मुलं आहेत. आम्हां सर्वांना उघड्यावर नका हो टाकूं. माझा सुरेन पै न् पै फेडून टाकील तुमची.

**काळे** : काय लाखांत बोललांत! अहो, तुमच्या बायकोची बुद्धि भ्रमिष्ट झाली असेल तर तिला वेड्याच्या इस्पितळांत टाका! विशेष काय त्यांत? तुमच्या रस्त्यावरच्या संसारांतलं तेवढंच एक माणूस कमी होईल. बापाचं कर्ज मुलानं फेडायचं! इतकीं वर्षं मी धीर कसा धरणार? माझी मागणी तुम्हांला मान्य नाहीं, तर मग मीं तरी तुमचं म्हणणं कां ऐकावं? माझी अट कबूल करा. कालिंदीला विहिरींत न ढकलतां माझ्या घरांत ढकला आणि तुम्ही आपलं आजचं मरण उद्यांवर ढकला.

**बाबा०** : कालिंदी तुम्हांला मिळणार नाहीं. त्यापेक्षां आजच मला मरण आलं तर तें मी पत्करीन.

**काळे** : ठीक आहे. माझा रस्ता मोकळा आहे. बराय्, येतों मी. बाबासाहेब, लवकरच मी तुम्हांला कायदेशीर थाटांत भेटेन. [ निघतो. ]

**बाबा०** : काळे– काळे– थांबा थोडं. ( त्यास अडवितात. )

**काळे** : आतां मला असं आडवं येऊन माझ्या कोर्टाच्या कामांत कशाला अपशकून करतां ? व्हा बाजूला ! ( उपरोधानें ) जय सुधारणा ! [ जातो. ]

**कैलास** : गेला हरामखोर !

**बाबा०** : डॉक्टर, तो आतां मला जन्मांतनं उठविल्याशिवाय रहायचा नाहीं. डॉक्टर, अगदीं निराधार झालों मी !

**कैलास** : आतां असं बोलून काय उपयोग ? घराण्याचा लौकिक राखण्यासाठीं एका मुलीला तुम्ही नुकतीच जन्मांतनं उठविलीत. आणि संपत्तीच्या लालसेनं सट्टा खेळून आतां तोच प्रसंग खुद्द तुमच्यावर आला आहे. रेखानं तुमचा कोणता अपराध केला होता म्हणून तुम्हीं तिच्या अंतःकरणावर जळते निखारे ठेवलेत ! तिच्या निष्पाप मनाचा तळतळाट तुम्हांला भोगावा लागणार आहे. त्या कर्मभोगाला या क्षणापासून सुरुवात झालीय् असं समजा. आतां आक्रोश करण्यांत काय अर्थ आहे ?

**बाबा०** : डॉक्टर, नका माझ्या दुःखावर डागण्या देऊं ! माझं मन कसं होरपळून निघालंय्. आम्ही आतां धर्मशाळेंत राहणार ! सारं जग मला दिवाळखोर म्हणून ओळखणार ! कुठं हें काळं तोंड लपवूं मी ? ( कांहीं तरी आठवून ) डॉक्टर, तुमचं तें विषाचं इंजेक्शन तरी द्या मला म्हणजे सुटेन मी या यमयातनांतून !

**कैलास** : तें रेखासाठीं राखून ठेवलंय्, तुमच्यावर त्याचा प्रयोग केला तर फांसावर जावं लागेल मला !

**बाबा०** : फांसावर ! ( एकदम नवीन विचार सुचून ) फांसावर ! डॉक्टर, आभारी आहें मी तुमचा. स्वतःच्या अब्रूचे धिंडवडे उघडया डोळ्यांनीं बघण्यापेक्षां जगांतनं नाहींसं व्हावं हेंच उत्तम ! ( उपरणें घेऊन त्याला गांठ मारीत ) गळफांस ! या उपरण्याचा असा फांस तयार करतों कीं एका झटक्यांत माझा कारभार आटोपेल. माणसाला मरणासारखा मित्र नसतो जगांत. तोच मला या संकटांतनं सोडवील. त्याच्या भेटीला जाण्याचा एकच मार्ग– तो म्हणजे गळफांस. ( उपरणें गळ्याभोंवतीं गुंडाळतात. )

**कैलास** : ( उपरणें ओढून ) शुद्धीवर आहांत का तुम्ही बाबासाहेब ? ( उपरणें काढून घेतो. )

**बाबा०** : सोडा डॉक्टर. मला मरूं द्या आतां !

**कैलास** : इतक्या सुखानं मरतां येणार नाहीं तुम्हांला ! बाबासाहेब, जरा शांत व्हा. तुमच्यावर कसलंहि संकट कोसळून पडलं तरी मी तुमच्या पाठीशीं उभा आहें. ( बाबासाहेबांना खुर्चीवर बसवतो. )

**बाबा०** : तुम्ही काय करूं शकणार ?

**कैलास** : तें लौकरच समजेल तुम्हांला. अगोदर माझं ऐका. या क्षणाला जाऊन रेखाला घेऊन या.

**बाबा०** : हा तुमचा अट्टाहास कां ? त्या वेश्येच्या मुलीला मी मुळींच घरांत घेणार नाहीं.

**कैलास** : ती वेश्येची मुलगी आहे असं कुणीं सांगितलं तुम्हांला ?

**बाबा०** : काळ्यांनीं !

**कैलास** : त्याच्या भूलथापांना तुम्ही बळी पडलांत. मी सांगतों तुम्हांला. रेखा वेश्येची मुलगी नाहीं.

**बाबा०** : ( आश्चर्यानें ) काय म्हणतां ? ती वेश्येची मुलगी नाहीं ? मग कुणाची ती मुलगी ?

**कैलास** : सारं कांहीं सांगतों. ती आणि मी एकाच अनाथाश्रमांत रहात होतों. तिचा सगळा इतिहास मला नुकताच समजला. ती वर्ष दीड वर्षांची असतांना तिचे आईबाप तापाच्या सांथींत लागोपाठ मेले. तिला जवळचं कुणीहि नातेवाईक नसल्यामुळं सरकारनं तिला अनाथाश्रमांत पोहोंचती केली. ती एका पांढरपेशा घराण्यांतली मुलगी असून कुलशीलानंहि अगदीं उच्च आहे. माझ्या या सांगण्याला तुम्हांला लेखीच पुरावा पाहिजे असला तर हा पहा पुरावा. ( खिशांतून पाकीट काढीत ) मी त्या आश्रमाच्या चालकांना विचारलं. त्यांनीं रेखाची हकीगत लिहून मला कळविली. हें पहा त्या चालकांचं पत्र. ( पाकीट देतो. )

**बाबा०** : ( पाकिटांतला कागद वाचून ) केवढा मूर्खपणा केला मीं ! तिच्यासारख्या सुशील मुलीला मी काय वाटेल तें बोललों. डॉक्टर, अगोदर कां नाहीं हा उलगडा केलांत ?

**कैलास** : तुमच्या सुधारलेल्या मनाचा परीक्षा पहात होतों मी.

**बाबा०** : मीं तिला नांवं ठेवलीं, तिच्यावर नाहीं नाहीं ते आरोप केले. केवढं पाप घडलं माझ्या हातनं !

**कैलास** : त्याचं प्रायश्चित्त घ्यायचं असेल तर तुम्ही असेच जा आणि रेखाला घेऊन या. त्या काळ्याकडं मी बघतों.

**बाबा०** : हा निघालोंच. ( कपडे घालीत ) ऐकलंत का, बाहेर या. मी रेखाला आणायला जातोंय्. कालिंदी—

[ शांताबाई व कालिंदी येतात. शांताबाईंची नजर जरा भ्रमिष्टासारखी दिसते. ]

**शांता०** : काय म्हणालांत ?

**बाबा०** : मी रेखाला घेऊन येतों.

**कालिंदी** : बाबा—

**बाबा०** : समजलं मला तूं काय विचारणार आहेस तें. मागाहून सांगेन सगळं. बरं, जातों. मी.

**कालिंदी** : तुम्ही गेल्यावर तो काळे आला तर–

**कैलास** : ( बाबासाहेबांना काठी देत ) ही काठी—

**बाबा०** : द्या इकडं. [ काठी घेऊन जातात. ]

**शांता०** : ( कैलासकडे पहात ) कोण तुम्ही ? हं...हं...आलं लक्षांत. तुम्ही...तुम्ही...डॉक्टर कैलास. हो...हो...डॉक्टर कैलासच. बसा. माझी तब्येत पहायला आलांत का ? नाहीं...नाहीं...कोणत्याहि डॉक्टरला माझ्या रोगाचं निदान करतां येणार नाहीं.

**कालिंदी** : ( घड्याळांत पाहून ) आई, तुझ्या औषधाची वेळ झाली. मी तयार करून आणतें. [ जाते. ]

[ कैलास शांताबाईंकडे विचित्र नजरेनें पहातो. ]

**कैलास** : अघोर कृत्य केलंय् तुम्हीं. त्याचं हें फळ. तुमच्या बुद्धीला भ्रम पडलाय्—

**शांता०** : कोण म्हणतं असं ? मुळींच नाहीं !

**कैलास** : आणि तो दूर करायला फारसा वेळहि लागणार नाहीं.

**शांता०** : डॉक्टर, तुमच्या असल्या शब्दांची भीति वाटते मला.

**कैलास :** मीं तुमच्या रोगाचं निदान केलंय्. आतां त्यावर उपाय-योजनाहि केली पाहिजे.

**शांता० :** मला कांहीं होत नाहीं. तुमची उपाययोजना नको.

**कैलास :** कडू औषध देणारा डॉक्टर रोग्याला नकोसा वाटतो. माझी उपाययोजना म्हणजे—हरबा—ए हरबा. ( आंतून 'जी' आवाज. ) बाहेर ये,

[ हरबा बाहेर येतो. डॉक्टर कैलासला पहातांच चमकतो. ]

**हरबा :** काय डागदरसाब ?

**कैलास :** हरबा, या घरांतला तूं नोकर आहेस. नोकर नेहमीं इमानी असावा लागतो. पण म्हाताऱ्या, तूं फार बेइमान झाला आहेस. तूं आपल्या मालकिणीला फसवलं आहेस.

**शांता० :** काय म्हणतां हें ? हरबानं मला फसवलं ?

**कैलास :** बोल हरबा, खरं आहे ना हें ? ( हरबा गोंधळतो ) कां ? असा गोंधळांत कां पडलास ?

**हरबा :** डागदर, म्या तसं कशापाई करीन ?

**कैलास :** म्हणजे तू आजपर्यंत प्रामाणिकपणानं वागलास. होय ना ? तर मग माझ्या लग्नाचा विचार निश्चित झाला. आतां तूं पुढच्या तयारीला लाग.

**हरबा :** ( चमकून ) डागदरसाब—

**कैलास :** असा चमकलास कां ? खरं खरं काय तें सांग. नाहीं तर माझा निश्चय या क्षणाला मी पुरा करीन. हरबा, या घटकेला तूं पाऊल मागं घेतलंस, तर माझं पाऊल पुढं पडलंच म्हणून समज.

**हरबा :** ( विचारपूर्वक क्षणभर थांबून ) डागदरसाब, बाईसाब, आतां मला खरी हकीगत सांगितलीच पायजे. ( पुन्हां अस्वस्थ होतो. ) बाई-साब, मन दगडावानी करून, बाबासाबांचा समदा राग मुकाट गिळून, मीं आजपातोर तुमच्या घरीं चाकरी क्येली. स्वोताच्या घरापरमानं मी हतं ऱ्हाइलों. ह्ये समदं कशापाई क्येलं मीं हाय ठावं तुमास्नी ? मागं तुमीं जें क्येलं त्या वक्ताला जर दुसरा कुनी मानूस असता, तर त्येनं पुना हतं पाऊल टिवलं नसतं; आन् तुमचं त्वांड बी बगितलं नसतं.

बाईसाब, तुमचा पहिला नवरा मेला तवा तुमी ऐन जवानीमंदीं व्हतां. तुमच्या नवऱ्याला मीं ल्हान पोरावानी अंगाखांद्यावरनं खेळवलं व्हतं. त्येंचं तुमासंगं लगीन झालं, आन बिचारा दीड वरसानं देवाघरीं ग्येला. तवां तुमी गरोदर व्हतां. माज्या मालकाचा वंश तुमच्या कुशींत वाढत व्हता. जवानीच्या नशेमंदीं इधवा न्हानं बरं वाटलं न्हाई तुमाला म्हनून पोटच्या पोराचा बळी देऊन तुमीं ह्यो संसार उभा क्येला. [ कालिंदी पेल्यांतील औषध ढवळीत प्रवेश करते व हरबाचें बोलणें ऐकत उभी रहाते. ] बाईसाब, मागली नीट याद करा. बाळानं जल्मल्याबरोबर ट्यहाँ केलं— पर तुमीं—तुमीं त्याचं नरडं काकडीवानी धरलं, आन त्या पोटच्या गोळ्याला खड्ड्यांत पुरन्यासाठीं माज्या स्वाधीन क्येलं. बाईसाब, देवाची करनी न्यारी असते. मानसाला उमग न्हाई पडत त्येचा. बाळाला फडक्यांत गुंडाळून मीं मसनवटींत गेलों. डोळं पुशीत खड्डा खनला. माज्या लहानग्या मालकाच्या कवळ्या अंगाला खड्ड्यांतलं खडं रुतूं न्हाईत म्हणून खड्ड्यांतला खडा न् खडा वेंचून काढला. बाळाला खड्ड्यांत ठिवलं. त्येच्या तोंडावर झाडाचा पाला ठिवला. मंग त्यावर माती लोटनार—तवा मला लई भडभडून आलं. माज्या मालकाची ती वंशवेल व्हती. बाळाला शेवटचं बगावं म्हनून रडत रडत मीं बाळाला खड्ड्यांतनं वर काढलं आन उराशीं धरलं. बाईसाब, देवानं दया केली. या म्हाताऱ्या उराची ऊब लागतांच बाळानं पुन्हां ट्यहाँ क्येलं. बाळ मेलं नव्हतं तर जितं व्हतं. त्येला घरीं परत आनन्याचा मीं इचार क्येला, पर तुमचं मन तवा ठिकानावर नव्हतं. पुन्हां तुमी बाळाला माराल, म्हनून मीं त्येला ततनं अनाथासरमांत पोंचतं क्येलं. त्यो तुमचा पहिल्या पिरतीचा बाळ——

**कैलास :** ( त्वेषानें ) म्हणजे मी. ( कालिंदीच्या हातून पेला पडतो. ) त्या वेळीं स्मशानांतल्या थंडीवाऱ्याचा त्रास मला होऊं नये, त्या स्मशानांतल्या खड्ड्यांतली माती आणि दगड माझ्या अंगाला बोंचूं नयेत म्हणून ( बॅगमधून स्वेटर काढून शांताबाईसमोर धरून ) हा स्वेटर ( त्यांच्या अंगावर टाकून ) माझ्या अंगावर घातला होतास ? हरबानं माझ्या विझलेल्या जीवनाची ज्योत पुन्हां पेटविली, आणि डॉक्टर कैलास म्हणून आतां मी तुझ्यासमोर उभा आहें. पहातेस काय अशी

माझ्याकडं डोळे फाडून ? सप्तपाताळांत गाडलेलं हें तुझ्या पापाचं पिशाच्च तुझ्यासमोर उभं आहे. आईच्या द्वेषाचं विष अंगांत भिनल्यामुळं काळा-ठिक्कर पडलेला हा डॉक्टर कैलास नीट पहा. पहिल्या लग्नाच्या मुलाची ब्याद घरांत नको म्हणून माझ्या नरडीला नख लावणाऱ्या चांडाळणी, तुझं तें दुष्कर्म पहात असतांना प्रत्यक्ष परमेश्वरानं डोळे मिटून घेतले असतील, काळपुरुषानं काळोखांत तोंड लपविलं असेल. माझ्या नरडीचा घोट घेण्यासाठीं तुझे हात पुढं सरसावले, आतां तुझ्या नरडीचा घोट घेण्यासाठीं माझे हात– ( बोटें करकरून आवळतो. )

**शांता०** : ( विस्फारित नजरेनें कैलासकडे पहात ) कैलास ! माझा कैलास ! मी अवदसेनं स्वतःच्या सुखासाठीं तुझा जीव घेतला ! तुझ्या प्रेतावर मीं दुसरा संसार थाटला ! कशी मी तुला माझा म्हणूं ? तुझा घात करणारी निष्ठुर राक्षसीण !–तुझी आई....

**कैलास** : ( विकट हास्य करीत ) माझी आई ! ( हंसतो. ) कालिंदी, ही तुझी आई, तीच माझी आई ! आईच्या अंतःकरणांत अमृताचे कुंभ भरलेले असतात ! हिऱ्यामाणकांनीं शृंगारलेल्या पाळण्यापेक्षां आईची मांडी सुखाची असते ! त्रिखंडाचं राज्य दिलं तरी त्यावर लाथ मारून माणूस आईच्या कुशीचा आश्रय घेतो. आईच्या प्रेमाचं वर्णन करतांना शब्दांचे सांठेहि तोकडे पडतात, ती ही तुझी आई ! नेत्रांचीं निरांजनं लावून हृदयाच्या फुलोऱ्यांत तिनं तुझी जपणूक केली, ती तुझी आई तीच माझी आई ! तुला ती मांगल्याची मूर्ति वाटते. तिची माया तुझ्या जीवनाची छाया आहे. पण कालिंदी, तीच माझी आई–( विकटपणें हंसतो. ) माझी आई– माझा जन्म होतांच केळीच्या कोंबाप्रमाणं नाजूक असलेल्या माझ्या मानेंत तिनं स्वतःचीं तीक्ष्ण नखं खुपसलीं. दुसऱ्या संसाराचं स्वागत करतांना तिनं माझं आयुष्य त्यावरून कोंबड्यासारखं ओवाळून फेंकून दिलं ! कालिंदी, हीच ती माझी आई—( पुन्हां विकटपणें हंसतो. )

**शांता०** : ( विकलतेनें ) कैलास– कैलास– या हातांनीं मीं तुझा गळा दाबला ! कैलास– मला– मला– क्षमा कर...बाळ, मला क्षमा कर !

( हुंदके देत कैलासच्या पायांवर पडतात. )

**कैलास :** मुलानं आईची क्षमा मागायची असते अशी जगाची रीत आहे. पण—पण—आजचा प्रसंगच असा आहे कीं, आई मुलाची क्षमा मागत आहे. ( हंसतो. त्याच्या मुद्रेवर संताप आणि सूड यांची भावना चमकते. ) माझी क्षमा हं ऽऽ! माझी क्षमा ( त्वेषानें वेडींवांकडीं बोटें तिच्या गळ्याजवळ नेतो. )

**कालिंदी :** ( किंचाळून ) आई ऽऽ ( आडवी येते. )

**हरबा :** ( कैलासला मागें खेंचीत ओरडून ) डागदर, काय करतां ह्यें ? आई हाय ती तुमची !

**कैलास :** ( दचकून मागें होत ) माझी आई ! माझी आई !

**हरबा :** ( कैलासला आंवरीत ) हां ! हां ! तुमची आई !

**कैलास :** ( अस्पष्टपणें ) माझी आई !

**शांता० :** ( रडत ) कैलास, माझ्या हातून घडलेल्या कृत्याची मला इतकी बोचणी लागलीय् कीं माझ्या तळमळणाऱ्या मनाला एक क्षणभरहि शांतता मिळालेली नाहीं. त्या पापाचं प्रायश्चित्त घेण्यासाठीं मला तुझ्या हातानं मरण पाहिजे. या वेदना मला आतां असह्य झाल्या आहेत. कैलास, तुझी आई तुझ्या पायाजवळ मरणाचं दान मागत आहे. कैलास, नको म्हणूं नकोस— नाहीं मला सहन होत ! सोडीव रे मला या यमयातनांतून ! पश्चात्तापाच्या होळींत होरपळण्यापेक्षां तुझ्या हातून शेवट झाला तर समाधान मिळेल मला— कैलास— एवढी भिक्षा घाल तुझ्या या आईला—

**कैलास :** ( अर्धवटपणें ) माझी आई— आई ! तूं माझ्या नरडीला नख दिलंस म्हणून मी तुझ्या नरडीला नख देऊं ! मी—मी—तुझा मुलगा—हा कैलास तुझा मुलगा ! ( सूडाची भावना नष्ट होऊन त्याची मुद्रा गंभीर होते. मोठ्या आवेगानें शांताबाईजवळ जाऊन ) आई ! माझी आई ! ( त्यांच्या डोळ्यांत खोलपणें पाहतो. ) आई, तूं कशीहि असलीस तरी माझी आई आहेस ! आई, तुझा विलक्षण तिरस्कार करीत मी आजपर्यंत जगलों, आतां यापुढं मला तुझ्या आशीर्वादावर जगायचंय् ! आई मला आशीर्वाद दे— आशीर्वाद दे.

**शांता० :** कसा आशीर्वाद देऊं तुला कैलास ? तुझ्या मनाचा मोठेपणा पाहिला कीं माझी दृष्टि लज्जेनं काळवंडून खालीं वळते. तुला आशीर्वाद देण्यासाठीं माझ्याजवळ शब्दच उरले नाहींत रे कैलास—

**कैलास** : असं म्हणूं नकोस. आई, मला तुझ्याजवळ बसूं दे (बसतो.) आई, एक क्षणभर मला तुझ्या सहवासाचं सुख मिळालं. उभ्या आयुष्यांत मला इतकं समाधान मिळालं नव्हतं. एवढा आनंद मला झाला नव्हता. हा एक क्षणाचा आनंद आयुष्यभर पुरेल मला. आज माझ्या तापलेल्या जिवाला शांतता मिळाली. एवढ्या सुखाच्या शिदोरीवर मला पुढचा प्रवास सहज करतां येईल. ( क्षणभर विचार करून ) आई, मी तुझा मुलगा आहे ही गोष्ट बाबासाहेबांना कळतां कामा नये. कारण ही गोष्ट त्यांना कळली तर त्यांच्या आजच्या त्रासांत आणखी भर पडेल आणि तुमच्या घरांत जें समाधान नांदतय् तें माझ्या अस्तित्वानं नाहींसं होईल. म्हणून यापुढं मला अज्ञातांतच राहू दे. कालिंदी, हरवलेलं सौख्य मला सांपडलं, पण मला त्याचा उपभोग घेतां येणार नाहीं. हा एक क्षणाचा आनंद माझ्या जीवनांत ( गहिंवरून ) पहिला आणि शेवटचा—

**बाबा०** : ( रेखा व सुरेनसह प्रवेशून ) आणि रेखा, तुझ्या पावलांनीं माझ्या घरांत नवा आनंद आला.

**काळे** : ( प्रवेशून ) म्हणूनच मीं सर्व घरावर जप्ती आणली आहे. बाबासाहेब, व्यवहार अत्यंत कठोर असतो. तरी बरं, मीं अगोदरच सर्व तयारी करून ठेवली होती म्हणून ही जप्ती अचानक आणतां आली. हं ऽ ऽ ! चला. अंगावरच्या कपड्यानिशीं इथनं बाहेर व्हा ! इथली सर्व मालमत्ता आतां माझ्या मालकीची आहे. बाबासाहेब, मला फार वाईट वाटतंय्. पण इलाज नाहीं. बाहेर बेलीफ आणि शिपाई उभे आहेत. त्यांच्याकडून इथल्या सामानाची मोजदाद केली पाहिजे. हा पहा जप्तीचा हुकूम. ( कागद दाखवितो. )

**बाबा०** : अखेर कसायकरणीनं तुम्हीं माझा घात केलांत !

**काळे** : हा घात नव्हे—कोर्टाचा हुकूम आहे.

**कैलास** : किती रक्कम देणं आहे ? बोल ! बघतोस काय माझ्याकडे असा ‘ आ ’ वासून ? ( चेकबुक काढून ) हा पहा चेक— ( सही करून ) मी सही केलीयू त्यावर. सांग किती रक्कम आहे ?

**काळे** : तुम्ही कां उगीच तसदी घेतां डॉक्टर ?

**कैलास** : ( करड्या सुरांत ) तुझी रक्कम लिही यावर. ( काळे चेकवर रक्कम लिहितो. )

**काळे** : ( चेकची घडी घालीत ) फार आभारी आहें मी तुमचा. माझा कोर्टाचा व्याप वांचला. बाकी डॉक्टर कैलास, तुम्हांला थोडंसं सांगावंसं वाटतं. दिवाळखोराला दया दाखविणं चांगलं नाहीं. तुमच्या या रकमेची फेड होईल ? ( चेक खिशांत घालतो. )

**कैलास** : चालता हो इथनं !

**काळे** : मी तर निघालोंच. पण डॉक्टर, तुम्ही माझ्यावरहि मात केलीत. ( कालिंदीकडे पहात ) तुम्ही आपल्या रकमेची वसुली कशी कराल तें आलं लक्षांत ! अखेर आमच्या तोंडचा घांस तुम्ही असा काढून घेतलांत अं !

**कैलास** : ( संतापून ) काळे—

**काळे** : जय सुधारणा ! [ जातो. ]

**बाबा०** : डॉक्टर, काय केलंत हें तुम्ही ?

**कैलास** : (अर्धवट स्वतःशीं) काय केलं ! (अस्वस्थतेनें कालिंदीकडे पहातो.)

**कालिंदी** : ( आवेगानें पुढं होत ) कैलास—

**कैलास** : मी भाऊबीज घातली !

**बाबा०** : मला कर्जमुक्त करून कसाबाच्या कचाट्यांतून तुम्हीं वांचविलंत ! या उपकारांतनं मी कसा उतराई होऊं ? डॉक्टर, माझी कालिंदी—

**कैलास** : बाबासाहेब, ओठांवरचे शब्द ओठांतच राहूं द्या. पुढं एक शब्द बोलूं नका. ( क्षणानें ) झालं माझं काम !

**बाबा०** : डॉक्टर, तुमच्यामुळं माझ्या घरांत आनंदी आनंद झाला !

**कैलास** : ठीक आहे. जातों मी.

**बाबा०** : असं कसं म्हणता डॉक्टर ? आतां जेवल्याशिवाय जायचं नाहीं.

**कैलास** : क्षमा करा मला. जिथं आनंद असतो तिथं मी थांबत नाहीं. ज्या वेळीं घरांत आनंद नाचत असतो त्याच वेळीं दारांत दुःख उभं असतं. मला तिकडं गेलं पाहिजे.

( जातांना दरवाजाजवळ उभे राहून पाठमोऱ्या शांताबाईंना नमस्कार करीत असतांना **पडदा पडतो.** )

● ● ●

# नीलांबरी

( स्वतंत्र सामाजिक नाटक )

ले. **विनायक देवरुखकर**

**किं. १॥ रु.**

( या नाटकाविषयीं ' सकाळ 'कार काय म्हणतात— )

" वेश्यांच्या जीवनासारखा विषय नाटकासाठी निवडूनहि प्रेक्षकांच्या अभिरुचीस चांगलें खाद्य कसें पुरवितां येतें, हें या छोटेखानी नाटकावरून दाखवितां येईल. रत्ना आणि श्यामा या दोन तरुण वेश्या, त्यांचा देहविक्रय करून खूप पैसा उकळूं पहाणारा त्यांचा धूर्त मामा, त्या मुलींची खरेदी करूं पहाणारे एक सुखवस्तु देशमुख नि दुसरे संतोषशेठजी, या श्रीमंत देशमुखांचा एक निर्धन, लहरी कलावंत भाऊ बिहारी–एवढ्या पात्रांभोंवतीं नाट्यवस्तूचा कलात्मक आविष्कार केलेला आहे. नाटकाच्या अखेरीस रत्ना ही देशमुखांची रखेली बनून पैशाची धनीण होण्यांत ती धन्यता मानते, तर श्यामा देहविक्रयाविरुद्ध बंड पुकारून गरीब बिहारीबरोबर संसार थाटण्यासाठीं घराबाहेर पडते. नाटकाचें कथानक तोकडें असूनहि तें अशा कांहीं खुलावटीनें आणि अखेरपर्यंत रहस्यपूर्णतेनें गुंफलेलें आहे कीं, प्रेक्षकाप्रमाणेंच वाचकालाहि सर्व नाटक एका बैठकींतच वाचून संपविण्याची ओढ लागावी. नाटककाराचें रचनाचातुर्य, नाट्यपूर्ण प्रसंगांची चढत्या श्रेणीनें मांडणी करून अखेर भावनोत्कटता साधण्यांत आहे. रत्ना आणि श्यामाचें स्वभावदर्शन मात्र ठोकळेबाज आहे. ' नीलांबरी ' या शिर्षकांतील गौप्यस्फोट शेवटच्या अंकांत बिहारी आपल्या प्रेयसीच्या मृत्यूच्या प्रसंगानें करतो. ती घटना प्रेक्षकांच्या भावना हलवून सोडणारी आहे. गाणारा नायक व नायिका योजण्यांत संगिताची बाजू नैसर्गीक रीतीनें खुलविली आहे. ही नाट्यनिर्मिति कलात्मकदृष्ट्या निःसंशय अभिनंदनीय म्हणावी लागेल. "

● ● ●

रंगभूमीच्या उज्ज्वल भवितव्यासाठीं प्रयोगक्षम नाटकांची
वाण आहे असें कोण म्हणतो !

## हीं नाटकें पहा—!

| | | | |
|---|---|---|---|
| १. | अंतरपाट | .... | नागेश जोशी |
| २. | भाग्याचा दिवस | .... | भार्गवराम वापट |
| ३. | डॉ. कैलास ( दु. आवृत्ति ) | | विनायक देवरुखकर |
| ४. | नीलांबरी | .... | विनायक देवरुखकर |
| ५. | जनकोजी शिंदे | .... | नानासाहेब गोखले |
| ६. | सुवर्णपदक | .... | माधवराव पातकर |

**आणि लौकरच—**

| | | |
|---|---|---|
| ? | .... | नागेश जोशी |
| नटीचा बंगला | .... | विनायक देवरुखकर |
| उंबरठ्यावर | .... | विनायक देवरुखकर |
| ? | .... | नानासाहेब गोखले |